


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# ८० जी प्रमाणपत्र

म. सा. परिषदेस देणगी देणाऱ्यांना आयकर खात्याकडून '८० जी प्रमाणपत्र' प्राप्त व्हावे म्हणून गेल्या दोन वर्षांपासून परिषदेचे प्रयत्न चालू होते. कळविण्यात आनंद होतो की, हे ८० जी प्रमाणपत्र परिषदेस नुकतेच प्राप्त झाले असून त्याची मूळ प्रत येथे प्रसिद्ध करीत आहोत. देणगीदारांना या प्रमाणपत्राचा निश्चितच उपयोग होईल. परिषदेच्या हितचिंतकांनी परिषदेस अर्थसाहाय्य करून कार्यकर्त्यांना प्रोत्साहित करावे, अशी विनंती आहे. इ. स. २००५-२००६ हे परिषदेचे शताब्दी वर्ष आहे. त्यासाठी विविध योजना व उपक्रम पार पाडण्यासाठी परिषदेतर्फे निधी उभारला जात आहे. सर्वांनी या निधीस सढळ हाताने मदत करावी, अशी विनंती आहे. आता पावतीच्या मागील बाजूस हे ८० जी प्रमाणपत्र मुद्रित करून घेतले जात असल्यामुळे वेगळ्या प्रमाणपत्राची गरज पडणार नाही. १०० वर्षांची वाटचाल पूर्ण करणाऱ्या या संस्थेस नवे-जुने सभासद, हितचिंतक व देणगीदार यांनी आर्थिक साहाय्य करावे, तसे आपल्या परिचितांनाही त्याबद्दल सांगावे, अशी नम्र विनंती. परिषदेस हे ८० जी प्रमाणपत्र प्राप्त होण्यासाठी मदत करणाऱ्या आयकर विभागातील संबंधित अधिकाऱ्यांची परिषद आभारी आहे.

सोबत : ८० जी प्रमाणपत्राची मूळ प्रत

**डॉ. गं. ना. जोगळेकर**
कार्याध्यक्ष, म. सा. प.

**No. Pn/T-I/80G/R $\frac{121}{131}$ /2002-2003**

Donations made to Maharashtra Sahitya Parishad, Tilak Road, Pune– 4110 30., will be eligible for the benefit of deduction u/s 80G of the income-tax Act, 1961, in the hands of the donors subject to the limits and condition prescribed therein.

2. The exemption granted to the above Trust is valid from 1.4.2000 to 31.03.2005 subject to adherance of following :

1. Receipts iss}d to the donors should bear the Ref. No. and date of this order.

2. The return of income accompanied by Statement of Accounts and Income & Expenditure Account, Balance sheet of the ibid Trust/Society to be submitted to the concerned Accessing Officer as per the specified d} date laid fown in the Income Tax Act.

3. If further renewal is required an application in Form No. 10 G should be made to this Office by ibid trust/Society alongwith the statements of accounts for the last 3 years alongwith the copies of acknoledgements of returns of income, and Certificate u/s 13(1) (c) of the I.T. Act, 1961, signed by the Trustees alongwith list of donors of amount of Rs. 500/- & above for the last 3 years.

Sd/-
(S.K. Jha)
Commissioner of Income Tax-I, Pune

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक ३०६
जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर २००३



संपादक
प्रा. डॉ. अरविंद वामन कुळकर्णी



**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी (०२०) ४४७५९६३

---

**म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार २८ सप्टें. २००३ रोजी सायं ४.३० वाजता माधवराव पटवर्धन सभागृहात होईल, याची सभासदांनी नोंद घ्यावी.**

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

**मुद्रक-प्रकाशक :** रवीन्द्र भट, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
**मुद्रणस्थळ** : स्मिता प्रिंटर्स १०१९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.
**अक्षरजुळणी** : एच. एम. टाइपसेटर्स, ११२०, सदाशिव पेठ, निंबाळकर तालीम चौक, पुणे ४११०३०

**सभासदांसाठी विनामूल्य**

**अंक क्र. ३०६ :** जुलै २००३ ते सप्टेंबर २००३

(महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे. या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी सा. सं. मंडळ किंवा राज्यशासन सहमत असेलच असे नाही. अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन समिती नेहमीच सहमत असेलच असे नाही.)

# संपादकीय

*मराठी साहित्यात सध्या दररोज नवनवीन पुस्तके प्रकाशित होत आहेत, ही समाधानाची बाब आहे. वेगवेगळ्या परिस्थितीत वावरत असलेल्या अनेकांना लिहावेसे वाटत आहे, ही बाब स्वागतार्हच म्हटली पाहिजे. काही थोडी पुस्तके प्रकाशन-संस्था प्रकाशित करीत असतात, हे खरे असले तरी बहुसंख्य पुस्तके प्रकाशित करण्यात लेखकाचा किंवा त्याच्याशी संबंधित असलेल्यांचा पुढाकार आणि सहभाग असतो हे दिसून येते. व्यक्तिगत प्रकाशन हा प्रकार मागच्या काळातही होता; पण त्याचे प्रमाण अल्प होते. त्या काळात दोनशे पानी पुस्तक चार-पाचशे रुपयांत प्रकाशित होऊ शकत असे. पण तेवढी रक्कम गुंतवणेही कुणाला शक्य नसे! प्रकाशकांचा व्यवहार बराचसा उधारीवर चालत असे; पण आपल्या प्रकाशनाला चांगल्या गुणवत्तेची पुस्तके मिळावीत अशी त्यांची धडपड असे. मुख्य म्हणजे, नव्या होतकरू लेखकांचा शोध घेण्याचे अगत्य प्रकाशकांना वाटत असे. एकदा एका प्रकाशकाशी नव्या लेखकाचे व्यावसायिक नाते निर्माण झाले, की ते कायम टिकून राहत असे. (लेखक-प्रकाशक यांमध्ये वितुष्ट निर्माण होत नसे, असे नव्हे; पण हे प्रमाण पुष्कळ कमी होते.) अमुक लेखक, अमुक एका प्रकाशन-संस्थेचा अशी सामान्यत: त्याची ओळख असे.*

*गेल्या पंधरा-वीस वर्षांत या स्थितीत पुष्कळ बदल झाला आहे. लेखकांच्या संख्येत सतत वाढ होत आहे. हे खरे असले, तरी प्रकाशनसंस्थांची संख्या म्हणण्यासारखी वाढलेली नाही, असे दिसून येते. त्याचा परिणाम अटळपणे आता जाणवत आहे. हल्ली बहुसंख्य पुस्तके व्यक्तिगत पातळीवर प्रकाशित होऊ लागली आहेत. कवितासंग्रह आणि कथासंग्रह यांच्या बाबतीत तर हे मोठ्या प्रमाणात घडत आहे. प्रकाशकाचे नाव म्हणून कुणाचेही नाव छापलेले असले, तरी सगळी गुंतवणूक लेखकाचीच असते, हे सर्वांनाच माहीत असते, आपल्या नावावर पुस्तक असावे या हौसेपायी पंधरा-वीस हजार खर्च करण्याइतका पैसा आज पुष्कळांजवळ खेळत असतो त्याचाही हा परिणाम आहे.*

*अशा नव्या पुस्तकाच्या प्रकाशनसंमारंभासाठी आणखी पाच-दहा हजार खर्च करावे लागतात (अशा समारंभांचेही एक तंत्र बनलेले आढळते). श्रोते जमावेत म्हणून मनोरंजनाच्या कार्यक्रमाची जोड द्यावी लागते ती वेगळीच.*

*गाजावाजा करून पुस्तक प्रकाशित झाले; पुढे काय? पुस्तक जर वाचकांपर्यंत पोचले; त्यांना ते वाचावेसे वाटले तर हे सर्व व्याप कारणी लागण्याची शक्यता. आपल्या पुस्तकाची वृत्तपत्रे, साप्ताहिके, मासिके इ. नी. दखल घ्यावी म्हणून नवे लेखक अखंड धडपड करीत राहतात. बहुतेक वेळा त्यांच्या पदरी निराशाच पडते. अशा लेखकांचे साहित्यव्यवहाराबद्दल गैरसमज तेवढे निर्माण होतात.*

*हे सगळे बदलता येईल; पण पुस्तक आणि झटपट प्रसिद्धी यापासून नव्या लेखकांनी दूर राहायचे ठरविले तरच!*

अनुक्रमणिका

**श्रद्धांजली**

गेल्या दोन-तीन आठवड्यांत साहित्य, संस्कृती, कला, शिक्षण, राजकारण, समाजसेवा, संस्थात्मक जीवन इत्यादी क्षेत्रांतील अनेक नामवंतांचे निधन झाले. त्यात शिक्षण क्षेत्रातील बॅ. पी. जी. पाटील, डॉ. के. भोगीशयन, बालभारतीचे रा. सो. सराफ, राजकीय क्षेत्र किंवा संस्थात्मक जीवन यामधले राजेंद्रसिंह, प्रेमलाताई चव्हाण, वामनराव गड्डमवार, कामगार नेते आर. जे. मेहता, अखिल भारतीय स्तरावरचे लेखक भीष्म साहनी आणि सुभाषचंद्र मुखोपाध्याय, आणि मराठी साहित्यात वेगवेगळ्या विभागात उत्तम भर घातलेले प्रा. पां. ना. कुलकर्णी, श्री. सुहास शिरवळकर, स्नेहलता दसनूरकर, प्रा. ह. श्री. शेणोलीकर, विद्याधर भागवत, कवी प्रल्हाद चेंदवणकर, कथाकार प्रकाश ना. संत यांच्याखेरीज ज्येष्ठ अभिनेत्री लीला चिटणीस आणि समाजसेवेला वाहून घेतलेल्या डॉ. मालविका प्रधान या सर्व व्यक्ती काळाच्या पडद्याआड गेल्या.

कोल्हापूरचे प्रा. पां. ना. कुलकर्णी हे नामांकित संशोधक व संतसाहित्याचे अधिकारी अभ्यासक होते. त्यांनी संपादन केलेली एकनाथपूर्व ज्ञानेश्वरी ही मराठी साहित्याची मोठी सेवा होय.

प्रा. ह. श्री. शेणोलीकर यांचा अधिकार तत्त्वज्ञान, संतसाहित्य आणि समीक्षा या क्षेत्रांत होता. उत्तम प्राध्यापक म्हणून त्यांचा लौकिक होता. बेळगाव आणि धुळे या ठिकाणी त्यांनी केलेले कार्य अजोड आहे. ते म. सा. प. चे निष्ठावंत कार्यकर्ते होते. श्रीमती स्नेहलता दसनूरकर यांची साहित्यसेवा विपुल आणि विविध होती. कथा-कादंबरीकार म्हणून त्यांना विशेष लोकप्रियता मिळाली.

सुहास शिरवळकर हे अकाली चटका लावून गेलेले लोकप्रिय कादंबरीकार व रहस्यकथाकार. हे गाजलेले व्यक्तिमत्त्व होते. मराठीतील मोजक्या लोकप्रिय लेखकांत त्यांची गणना होते. विद्याधर भागवत यांनीही विपुल प्रकारचे लेखन सातत्याने करून स्वत:चे स्वतंत्र स्थान निर्माण केले होते. प्रकाश नारायण संत यांना आई-वडिलांकडून वाङ्मयीन परंपरा लाभली असली तरी दर्जेदार कथालेखक हा त्यांनी स्वत: संपादन केलेला लौकिक होता. त्यांच्याकडून अजून भरीव लेखनाची अपेक्षा होती, पण दुर्दैवाने त्यांचे निधन अपघातामुळे अकाली झाले. प्रल्हाद चेंदवणकर हे पहिल्या पिढीतले दलित कवी. मात्र त्यांचे व्यक्तिमत्त्व व कार्य इतर दलित लेखकांपेक्षा वेगळे होते.

मागल्या पिढीतील नाटक व चित्रपट हे क्षेत्र गाजविलेल्या अभिनेत्री म्हणून लीला चिटणीसांचे व्यक्तिमत्त्व अजोड असे होते. 'चंदेरी दुनियेत' हे त्यांचे आत्मकथन वेगळे विश्व चित्रित करणारे आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे या थोर दिवंगतांना विनम्र श्रद्धांजली.

**संपादक**



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
# पारितोषिकाचे मानकरी प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख
# यांचे मनोगत



**९७ वा वर्धापन समारंभ मंगळवार, दि. २७ मे २००३**

या वर्धापन समारंभाचे सन्माननीय प्रमुख अतिथी डॉ. श्रीराम लागू यांना सर्वप्रथम स्नेहादरपूर्ण अभिवादन करतो. त्यांच्या आजवरच्या अनेक भेटींतला आनंद, आज या क्षणी एकवटून आलेला मी अनुभवतो.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे माननीय कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर, प्रमुख कार्यवाह रवीन्द्र भट, त्यांचे कार्यकारी मंडळ, संपादक डॉ. अरविंद कुलकर्णी आणि कोषाध्यक्ष रत्नाकर कुलकर्णी या सर्व मान्यवरांनाही माझा स्नेहादरपूर्वक नमस्कार.

परिषदेची स्वत:ची जागा आणि वास्तू असावी म्हणून ज्यांनी मोठे प्रयास केले ते माझे गुरुवर्य श्रीपाद महादेव माटे, आणि हे सभागृह ज्यांचे स्मारक म्हणून ओळखले जाते ते श्रेष्ठ कवी माधव ज्युलियन यांच्या स्मृतीसही या समारंभप्रसंगी मी नम्र भावाने प्रणाम करतो. प्राध्यापक माटे आणि कविवर्य माधव जूलियन यांनी आपल्या जीवितावधीत जे व्यासंगपूर्ण व उत्कटभावसंपन्न कार्य केले, त्याने मराठी साहित्याची काही दशके भारून गेली होती. त्या काळात मी पुण्यात वावरत होतो याची आज आठवण झाल्यावाचून राहत नाही.

माधवराव पटवर्धन १९३९ च्या नोव्हेंबरात कालवश झाले. त्याआधी केव्हातरी जुलै-ऑगस्टात पेरुगेट-भावे हायस्कुलात एका लहानशा खोलीत 'नकुलालंकार' हे माधवरावांचे खंडकाव्य प्रकाशित झाले. त्या समारंभाला मोठ्या कुतूहलाने मी गेलो होतो. माधवरावांची सगळी कविता आधीच आवडीने वाचली होती. 'गज्जलांजली' जवळजवळ पाठ होती

*सतेज काळे टपोर डोळे*
*दिसावयाला गरीब भोळे*
*अता लबाडी स्मरून त्यांची*
*हुताशनी मी अखंड पोळे!*

अशांसारख्या ओळी अहोरात्र मनाशी घोळवत विद्याभ्यास करावा, किंवा एकान्तात हुळहुळत राहावे, असे ते दिवस होते.

त्या अध्ययनकाळात पुण्याकडून मी खूप काही घेतले. अभ्यासाचे आणि अवांतरही पुष्कळ वाचले : सावरकर, सुभाषचंद्र बोस, वा. म. जोशी, दत्तो वामन पोतदार, आचार्य अत्रे, बॅ. जयकर इत्यादी मनस्वी कर्मयोगी पुरुषांची भाषणे ऐकली : हॉलिवुड्च्या सुवर्णयुगातले निवान्त मनोवेधक चित्रपट पाहिले : शास्त्रीय आणि सुगम गाण्यांच्या मजलसींना गेलो : पुण्यातल्या लहरी पावसात आणि सुगंधी चांदण्यात जिवलग मित्रांबरोबर दूरदूर भटकलो... तो काळ आता स्वप्नांसारखा होऊन गेला आहे. तरी त्याने पेरलेला हंगाम माझ्या लेखनातून उभारीला आला आहे, हे मला जाणवते.

आज पुणे फार बदलले आहे : त्याचे शांत प्रसन्नपण लोपले आहे. तरीही इथे जोडलेल्या मित्र-मैत्रिणींचा जिव्हाळा, आणि इथल्या एकूण संस्कृतीची स्वागतशीलता उणावलेली नाही, हे सुदैव समजतो.

या क्षणी गो. म. कुलकर्णी, ग. वा. बेहेरे, नरेश कवडी, व. दि. कुलकर्णी, शांताबाई शेळके या दिवंगतांची मला आठवण येत आहे.

या सन्मानाच्या प्रसंगी माझ्या आईवडिलांच्या पुण्यस्मृतीला मी श्रद्धायुक्त अंत:करणाने अभिवादन करतो. मागोमाग, शाळा-कॉलेजांतील आदरणीय गुरुजनांची मला आठवण येते. त्यांच्या अनुभवातून आणि आचरणांतून विद्याप्रेम आणि सौहार्द मी घेतले. कित्येक थोर महानुभाव, त्यांच्या जगन्मान्यता पावलेल्या ग्रंथांतून मला भेटले. त्यांच्या प्रतिभेने माझ्या जीवनाला सहनबळ दिले, आणि निर्माणाची निर्मळ ऊर्जाही.

प्रत्यक्ष जीवनात, ज्या सत्पुरुषांचा आणि प्रतिभाशाली सन्मित्रांचा संवाद आणि सहवास मला घडला, त्याने वेळोवेळी मी उत्साहित झालो : दु:ख-संकटात धीराने वागू शकलो. माझ्यातील निर्माणशक्ती क्रियाशील राहिली.

ज्यांचा उल्लेख केल्याविना राहवत नाही ते सोलापूरचे देशभक्त कवी कुंजविहारी, कर्नाटकचे श्रेष्ठ साहित्याग्रणी द. रा. बेन्द्रे आणि सोलापुराजवळ एका खेडगावी भीमानदीकाठी समाधिस्थ झालेले साक्षात्कारी योगी बाबामहाराज आर्वीकर; तिघांच्याही सहवास-स्मृतीला मनोभावाने मी वंदन करतो.

'निरपेक्षपणे साहित्यसेवा केली' म्हणून महाराष्ट्र साहित्य परिषद आज माझा सन्मान करीत आहे. तो मी आनंदाने स्वीकारतो.

संपत्ती जोडावी, कुठले सत्तास्थान मिळावे म्हणून मी लेखन केले नाही, हे तर खरेच आहे. पण माझ्या लेखनाचे स्वागत करणाऱ्या दूरस्थ रसिक-स्नेह्यांनी या गोष्टीची आवर्जून दखल घ्यावी आणि त्यासाठी गौरवाचे माप घालावे, याचा माझ्या मनाला संकोच वाटतो. हेही अपेक्षित नव्हते, कारण वयाच्या पंधरा-सोळाव्या वर्षापासून थोडेफार लिहीत आलो, ते आंतरिक ऊर्मीला प्रकट करावे म्हणून. तिथे संकोच केला नाही. बाहेरच्या अपेक्षांना प्रतिसाद नाही दिला तरी माझ्याच माझ्याकडून काही अपेक्षा होत्या.

साहित्याचे किंवा कोणत्याही कलेचे निर्माण ही एक विशेष कर्मप्रवृत्ती आहे. ती कधीच निरुद्देश असत नाही. उद्देशाला अपेक्षा असतात.

'जीवितास' या नावाची गोविंदाग्रजांची एक कविता आहे. त्यात त्यांनी उभा केलेला प्रश्न हृदयस्पर्शी आहे.

*आणि जीविता, लाभ हाच का तुझ्या संगती राहुनिया?*
*असेच जाणे असे सदा का कालौघावर वाहुनिया?*

माणसाच्या जीवनाला काही प्राप्तव्य असते. काही संपादनीय असते. काही त्याज्य वाटत असते. आपण कोण? आपले लागेबांधे ज्यांच्याशी त्यांचे जीवन सुखी आणि शुभंकर कशाने होईल, आपल्या बरोबर त्यांचेही दु:ख कसे निपटून निघेल याविषयीची चिन्ता श्रेष्ठ साहित्याच्या निर्माणामागे असते.

गीतेमध्ये वर्णन केलेल्या योगी भक्ताप्रमाणे साहित्यिक वा कलावंत 'अनपेक्ष, उदासीन आणि गनव्यथ' असत नाही. अपेक्षांची असोशी त्याच्यापाशी असते. ज्ञानदेवांचे पसायदान आठवले की मनात भरते ती त्यांची सर्व जनबांधवांची कल्याणचिंता आणि त्यामुळे होणारी त्यांच्या अंत:करणाची तगमग. कृतींच्या हेतूंमध्येच आपला धर्म, आणि त्यांच्या परिणामात नीती प्रगट होते.

'जिवामधील जाणती। कळाचि ते सरस्वती' असे रामदासांचे एक वचन आहे. ही जाणती कळा व्यक्तीला विश्वाशी जोडते.... ज्ञानप्रेमी तरी भावाकुळ करते.... श्रद्धावान् ठेवूनही कर्मशीलता देते. साहित्यातली चित्कळा निर्मात्याला आणि आस्वादकाला एकांड्या जीवभानाकडून सामाजिक भानाकडे ओढते.

सामाजिक वास्तवात संघर्षाला आणि द्वंद्वाला उणे मुळीच नसते. विषमता आणि अन्याय भरपूर असतात. अनाचार, हिंसा आणि विध्वंस यांची चलती असते. जाणत्या कळेचा म्हणजे विश्वात्मक चैतन्याचा स्पर्श झालेल्या साहित्यात, वास्तवाची अनिवार्य कुरूपता तर येतेच, पण तिच्यावर मात करणारे सत्त्वाढ्य असे काही निश्चित असते. स्नेह आणि सख्य, प्रेम आणि करुणा यांनी विलगता कशी बुजून जाते, आणि वैरभाव कसा निरस्त होतो, याचा प्रत्यय श्रेष्ठ साहित्य देत आले आहे.

सगळे आयुष्य मी कर्नाटकाच्या सीमेलगत असलेल्या सोलापुरात काढले. अध्ययन आणि अध्यापन यांचा वसा घेतला तो इमानाने पार पाडला. माझे लेखन जीवनसंदर्भांशी विणलेले असल्याने स्वभावत:च सत्यशोधक आणि सद्भावपूजक झाले आहे, असे मला वाटते.

खोट्या लाडीगोडीचे किंवा भ्रामक अवडंबराचे मी काही लिहिले नाही. तरी माझ्यातल्या चैतन्याला, एकूण घुसमटीत आणि दु:खभारातही जी स्वप्ने पडतात, त्यांना मी कधी लगाम घातला नाही. स्वप्ने मातीत रुजतात आणि आकाशात उगवतात. चंद्रावरची माती मुठीत घेता येते आणि प्रयोगशाळेत तिची चिकित्सा होते, पण त्याचे चांदणे जन्मजन्मांतरातील ओढीला आवाहन कसे करू शकते, याचे कोडे पडते. ते चांदणे मी अयथार्थ मानले नाही.

सुभाषचंद्रांची, भगतसिंहांची, विवेकानंदांची, साने गुरुजींची, आरती प्रभूंची आणि

मर्ढेकरांची स्वप्ने विफलार्थ नाहीत, असा माझा विश्वास आहे.

व्यक्तीला मी सामाजिक परिवर्तनाचे मूळकेंद्र मानतो. समाजाची रूपचर्या आणि त्याचे अंतरंग बदलते ते एकेक व्यक्तीच्या माध्यमातून. दुसरी वाटच नाही. कथा-कादंबऱ्यांतील व्यक्तिरेखा, म्हणूनच समाजाच्या अंतरंगाची रूपदर्शने होतात.

रामदासांची 'जाणती कळा' आणि गुरुदेव रानड्यांचा 'डिव्हाइन् कॉन्शसनेस' ही वेगळी नाहीत. विख्यात कादंबरीकार जोसेफ कॉनरॅड सांगतो की : सहृदय वाचकांची एकच मागणी असते.... या दैनंदिन कर्मजंजाळातून मला बाहेर काढा आणि आत्मिक जाणिवेच्या प्रकाशात घेऊन चला. त्याचे शब्द आहेत, 'द लाइट ऑफ इम्पेरिशेबल कॉन्शसनेस' हा 'अविनाशी जाणिवेचा प्रकाश' निर्मळ सुखाच्या व श्रेयस्कराच्या वाटेवर नेतो.

साहित्य आणि इतर ललित कला यांनी तुमची-आमची मने सत्यवादी, प्रेमशरण आणि शिवाकांक्षी होओत अशी इच्छा व्यक्त करून माझे थोडे लांबलेले बोलणे आवरते घेतो.

आपणा सर्वांना पुन्हा एकवार नमस्कार.

❑

---

## स्वागत

**स्वप्न सावल्या,** राजेंद्र प्रधान, साहित्य प्रसार केंद्र, नागपूर, पृ. १३९
**लीळाचरित्र एकाक,** संपा उपासे/कळके/कुंभार, हिरण्यकेशी प्रका. कोल्हापूर, ११२
**देश-परेदश,** डॉ. शंकरराव पोतदार, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, १३६
**देवाघरची फुले,** डॉ. इंदुमती देव, निहारा प्रकाशन, पुणे, ३२
**उपेक्षित दुर्गांचा इतिहास,** जॉ. जी. बी. शहा, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली, ७८
**आपले संत,** प्र. न. जोशी, कर्मवीर प्रकाशन,, पुणे, ६०
**भारतीय थोरमाता,** प्र. न. जोशी, शिव पब्लिकेशन, पुणे, १०८
**जागतिक धर्मवीर,** प्र. न. जोशी, शिव पब्लिकेशन,, पुणे, ७२
**महापुरुषांच्या प्रणयकथा,** प्र. न. जोशी, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, १४०
**लोकगीतातील आपला देव्हारा,** प्र. न. जोशी, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, ६४
**बहिणा,** प्र. न. जोशी, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, १०४
**आलो याचि कारणासी,** प्र. न. जोशी, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, ३८२
**असे हे पु. ल.,** बालशंकर देशपांडे, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, २१२
**भाव फुलोरा,** राज. पी. अहेरराव, सुयश प्रकाशन, पुणे, ६८
**कुरूप मुलीची गोष्ट,** प्रकाश चितळे, स्नहेवर्धन प्रकाशन, पुणे, १००
**मनाचिये डोही,** मृणालिनी चितळे, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, १४०
**मराठी शोकांतिका**-नवविचार पुष्पलता, राजापुरे-तामस, स्नेहवर्धन-व मुं वि. म. विभाग, ३०४

# काकदन्तगवेषणा – देशीवाद : एक चिकित्सा



**मधुकर नाईक**

संस्कृतमध्ये अनेक प्रसिद्ध 'न्याय' आहेत. त्यांपैकी 'काकदन्तगवेषणा' हा एक आहे. याचा अर्थ कावळ्याच्या मुखातील दात मोजण्याचा प्रयास – अर्थात् एक विफल प्रयास. इंग्रजीत याच्या समानार्थी अशी तत्त्वज्ञानाची व्याख्या केली गेली आहे : तत्त्वज्ञान म्हणजे अमावास्येच्या मध्यरात्री अंधेऱ्या खोलीत, तेथे नसलेल्या काळ्या टोपीचा शोध घेणे!

देशीवाद (Nativism) या विचारप्रणालीविषयी लिहिताना संस्कृतपासून सुरुवात करणे अतीव धाष्टर्याचे ठरावे, कारण संस्कृत भाषा, साहित्य व परंपरा यांच्या दुस्वासावरच देशीवादाचा पिंड पोसलेला आहे. माझे विद्वान मित्र प्रा. गदांधर पानसंबळे यांनी म्हटल्याप्रमाणे 'फाजील स्तुती केली गेलेल्या कालिदासाच्या **'मेघदूत'** मधील मिळमिळीत शृंगारापेक्षा गौतमभूषण आसुड यांच्या सुप्रसिद्ध **''Xमारी या पोस्टमन्याच्या- Xडू साल्याच्या''** या दीर्घ कवितेतील रांगडी रंडीबाजी शतपटीने प्रभावी वाटावी!' असो.

देशीवादाला अलीकडच्या काही वर्षांत उदंड प्रसिद्धी लाभली आहे. डॉ. गणेश देवी यांच्या **'After Amnesia' (1992)** या टीकाग्रंथात देशीवादाची भूमिका स्पष्ट करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. प्रयत्न केलेला दिसतो म्हणण्याचे कारण या ग्रंथात तर्काची इतकी ओढाताण व मतांच्या इतक्या कोलांट्या उड्या घेतल्या आहेत की लेखकाची भूमिका सुस्पष्ट होतच नाही. भारतीय इंग्रजी साहित्याचे नामवंत भाष्यकार - प्रा. सी. डी. नरसिंहय्या यांनी या ग्रंथाच्या अक्षरश: चिंधड्या उडविलेल्या आहेत. या ग्रंथाला (कसे काय देव किंवा देवी जाणे!) साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाल्यावर, 'अकादमीने आपल्या निर्णयाने खुद्द स्वत:चा व एकंदरीत बौद्धिक विश्वाचा मोठाच अधिक्षेप केला आहे,' असे ते म्हणतात.

पण देवी यांचा ग्रंथ अवतरण्याआधी सुमारे एका तपापूर्वीच डॉ. भालचंद्र नेमाडे यांनी आपल्या दोनतीन निबंधांतून देशीवादाचा पुरस्कार केलेला दिसतो. उदा. मराठी कादंबरीवरील त्यांचा मराठीत लिहिलेला व देवी यांनी इंग्रजीत अनुवादलेला निबंध **(Setu -journal of Indian literature in Translation,** Vol. III No. 1. 1986)

`The concept of Nativision' (New Quest (May-June 1984). म्हणजे देवी हे देशीवादाचे येशूख्रिस्त आहेत असे मानले तर डॉ. नेमाडे हे त्याचे जॉन द बप्टिस्टच ठरावेत!

देशीवादाची चिकित्सा करण्याआधी या संप्रदायाची भूमिका काय आहे हे पहायला हवे.

या विचारप्रणालीतील सुरुवातीचे तत्त्व हे की, भारत ही एकसंध संस्कृती नाही. तिच्यात अनेक वेगवेगळ्या साहित्यिक, सांस्कृतिक परंपरा दिसतात. यासाठी प्राचीन भारतीय संगीतात वापरल्या गेलेल्या दोन संज्ञा आपल्या विविध संस्कृतिसंपुटाचा विचार करताना उपयुक्त ठरतात : या दोन संज्ञा म्हणजे **मार्ग** व **देशी. मार्ग** म्हणजे उच्चभ्रू आणि **देशी** म्हणजे सामान्य जनांचा. येथे अर्थात मार्ग म्हणजे संस्कृत साहित्य व देशी म्हणजे प्रादेशिक भाषेतील साहित्य. संस्कृतचा आता काहीच उपयोग नाही. एकतर ही परंपराच हजारो वर्षांपूर्वीची, आता लुप्त झालेली; शिवाय ती तर मूठभर लोकांची भाषा. याउलट पाश्चात्त्य साहित्यिक परंपरा तर परकीच. तरी देखील संस्कृत परंपरेचा प्रचंड दबदबा एका बाजूला, तर पाश्चात्त्य साहित्याचा जबरदस्त रेटा दुसऱ्या बाजूला. यामुळे आपल्या भारतीय भाषांतील साहित्याची गळचेपी होत आहे. ह्यातून सुटण्याचा एकच मार्ग म्हणजे मध्ययुगीन प्राकृतांतील साहित्याचे आदर्श आपण घ्यायला हवेत. हे आदर्श आपण विसरून गेलेले आहोत. डॉ. देवी यांच्या ग्रंथाच्या शीर्षकातील ते हे विस्मरण (Amnesia). देवी पुढे म्हणतात, आजचे भारतीय लेखक इतके खुजे आहेत कारण ते एक तर पाश्चात्त्य लेखकांचे अनुकरण करतात किंवा आत अडगळीत पडलेल्या संस्कृतातील आदर्श पुन्हा उभवू पाहतात. या दोन टोकांतील 'भाषा'परंपरा मात्र ते विसरून गेलेले आहेत.' (देवी १९९२, ४९)

डॉ. नेमाडे यांचेही असेच मत आहे. 'आपले आदर्श आपणच निर्मिलेले हवेत. तेव्हा अखिल भारतीय सांस्कृतिक परंपरा या फसव्या आदर्शाचा आधार न घेता आपण आपली गल्ली, आपलं खेडं, आपला तालुका व आपला जिल्हा यांवरच भर द्यायला हवा. अखिल भारतीय परंपरा ही सामाजिक वर्चस्व गाजवणाऱ्या वर्गाने वापरलेली एक राजकीय खेळी आहे एवढेच.' (नेमाडे १९८४, १३६)

**देशीवादाच्या** संदर्भात एक उपरोधपूर्ण गोष्ट अशी की, देशीवाद हा मुळात देशी नसून सर्वस्वी परदेशी आहे व तो अमेरिकेहून आयात केला गेलेला आहे. डॉ. मकरंद परांजपे यांनी दाखवून दिलेले आहे की, देशीवादाचा जनक राल्फ् लिंटन् हा नामवंत मानववंशशास्त्रज्ञ आहे. त्याने आपल्या 'Nativistic Movements' ह्या निबंधात देशीवादाची व्याख्या अशी केलेली आहे : 'देशीवाद म्हणजे समाजाच्या एखाद्या लहान समुदायाने त्याच्यापेक्षा अधिक बलवान सांस्कृतिक परंपरा सांगणाऱ्या मोठ्या समुदायाविरुद्ध केलेले प्रतीकात्मक व व्यूहरचनात्मक बंड.' (कित्ता)

देशीवादाचा आणखीही जनक असावा असे मानण्याला पुरावा आहे; अन्तोनिओ ग्रॅम्स्ची (१८९१-१९३७) या इटालियन साम्यवादी विचारवंताने 'Hegemony' (वर्चस्व) चा सिद्धान्त मांडलेला आहे. त्याच्या मते राजकीय व सामाजिक क्रान्ती घडून येते तेव्हा सत्ताधारी वर्ग दोन प्रकारे आपलं वर्चस्व स्थापित करू शकतो. (१) बलप्रयोग करून; (२) जित्यांना आपल्या वर्चस्वाचा स्वीकार करणे भाग पाडून. (डॉ. के. रं. शिरवाडकर– म. सा. पत्रिका अंक ३०१.) याचे उदाहरण म्हणजे गोऱ्यांनी आफ्रिकन देश जिंकले तेव्हा घडून आलेले परिवर्तन – हे बलप्रयोगाने झाले होते. परंतु वर्चस्व गाजवून अधिक यशस्वीपणे



अनुक्रमणिका

यशप्राप्ती होऊ शकते. उदा. - आशियन देशांना आपली संस्कृती, विचार, मूल्यव्यवस्था यांचा शिक्षणाद्वारे प्रसार घडवून इंग्रजांनी या देशात आपले वर्चस्व स्थापित केले. देशीवादी हा सिद्धान्त भारतीय साहित्याला लावून असे म्हणतात की, संस्कृत व इंग्रजी ह्या दोहोंचेही वर्चस्व झुगारून देऊन भारतीय साहित्याने आपली स्वत:ची वाङ्मयीन मूल्यव्यवस्था निर्माण करायला हवी.

देशी-वादाचा आणखीही एक जनक संभवतो. आजचे युग दलित, पीडित, दबलेले, कपाळी 'दुय्यम' (Subaltern) असा शिक्का मारलेले, या साऱ्यांचा कैवार घेणारे आहे. देशीवाद हा याच विचारप्रणालीचा आणखी एक आविष्कार आहे. (परांजपे, १९९७ XX- XVI)

देशीवादाचा उगम कोठेही झालेला असो पण त्याचा मूळ स्रोत परदेशात आहे, हे उघड आहे. इतकेच नव्हे, तर ज्या विचारप्रणालीतून देशीवाद निर्माण झाला त्या प्रणालीचा साहित्याशी सुतराम संबंध नाही. अलीकडे साहित्यप्रान्तात एक विलक्षण चमत्कार दृष्टीस पडतो. साहित्याशी ज्यांचा काहीही संबंध नाही व साहित्यात ज्यांना मुळीच रस नाही अशा तत्त्वज्ञ, मानसशास्त्रज्ञ, भाषाशास्त्रज्ञ इत्यादींनी साहित्याचा उपयोग केवळ त्यांच्या त्यांच्या प्रान्तातील समस्यांचे विश्लेषण करण्यासाठीच केलेला दिसतो. म्हणूनच आज 'लेखकाचा मृत्यू' वाचकाचा मृत्यू व (संहितेचा मृत्यू) `Death of The Author', 'Death of the Readers, `Death of the Text' यांसारखे अजब सिद्धान्त मांडले जात आहेत. प्रत्यक्ष एखादा ग्रंथ वाचकाला अधिक चांगला कसा कळेल अशा प्रकारचे प्रश्न या विद्वानांच्या मते अप्रस्तुत ठरतात. ग्रंथांपेक्षा ग्रंथनिर्मितीची प्रक्रिया, भाषारचनेची प्रक्रिया –इत्यादी तात्त्विक विचारातच हे विद्वान गर्क झालेले दिसतात. पण साहित्य म्हणजे केवळ सिद्धान्त नसून ते प्रत्यक्ष ग्रंथरूपी असते हा साधा विचार आज कोणीही करताना दिसत नाही!

भारतीय साहित्याच्या दृष्टीने तर या सर्व प्रकारात आणखी एक धोका आहे, असे दिसते. नवनवे पाश्चात्त्य सिद्धान्त उसने घेऊन ते भारतीय साहित्याला लावून दाखविण्याची कसरत करणे म्हणजेच विद्वत्ता असा समज आज रूढ होऊ पाहतो आहे. देशीवाद हा याचेच एक उत्तम उदाहरण आहे.

डॉ. लिन्टन यांचा देशीवादाचा सिद्धान्त तशाचा तसा उचलून तो भारतीय भाषांना लावणे हे किती हास्यास्पद आहे ते पहा. वर्चस्ववादाचा सिद्धान्त हा राजकीय व सामाजिक संदर्भात अगदी योग्य असेलही, पण तो केवळ साहित्यिक संदर्भात लावणे किती धोक्याचे आहे याचे एकच उदाहरण पहा : रोमने ग्रीस देश जिंकल्यावर, 'जिताने जेत्याला जिंकिले' अशी परिस्थिती निर्माण झाली असे म्हणण्यात येते, कारण ग्रीक साहित्य व मिथ्य कथा यांनी रोमन समाजाचा कब्जाच घेतला; इतका की, सुप्रसिद्ध रोमन कवी हॉरेस याने आपल्या `Ars poetica' या ग्रंथात होतकरू कवीने रात्रंदिवस ग्रीक साहित्य वाचावे असे म्हटलेले आहे. आता लिंटनच्या सिद्धान्ताप्रमाणे जेते रोमन यांच्या साहित्याचे जित ग्रीकांनी अनुकरण करावयाला हवे होते, पण आपण आणखी दोन हजार वर्षांनी मांडल्या जाणाऱ्या एका प्रतिष्ठित सिद्धान्ताविरुद्ध जात आहोत याची रोमन व ग्रीक यांना काय कल्पना!



अनुक्रमणिका






संस्कृत व भारतीय भाषा यांच्यातील परस्परसंबंधांबद्दलही देशीवाद्यांची भूमिका अशीच चुकीची आहे. संस्कृत व प्राकृत यांच्यात वैरभाव कुठे होता? वस्तुस्थिती अशी आहे की, प्राकृत भाषा संस्कृतातून जन्मल्या. पाली आणि अर्धमागधी यांना बुद्ध आणि जैन यांनी प्रसारक्षमता दिली कारण संस्कृतपेक्षा प्राकृत जनसामान्यांना कळायला सोपे होते. पण संस्कृतने प्राकृतांना कधीच परके मानले नाही. संस्कृत नाटकातील सर्वच स्त्रीपात्रे (शकुन्तलादी नायिका सुद्धा) प्राकृतातच बोलतात. तीच गोष्ट दुय्यम पात्रांची. इतकेच नव्हे, तर प्राकृतातून संस्कृतात अनुवादही होत राहिले.

उदा. **कथासरित्सागर** हा सुप्रसिद्ध कथासंग्रह मुळात पैशाची भाषेत लिहिला गेला व तिथून त्याचे संस्कृतात रूपांतर झाले.

ग्रॅम्स्चीचा वर्चस्व-सिद्धान्त भारतीय साहित्याला लागू करणे हे सर्वस्वी अनुचित आहे. डॉ. पाटणकर यांनी दाखवून दिल्याप्रमाणे, 'ग्रॅम्स्चीचा सिद्धान्त सर्वस्वी एका विशिष्ट परिस्थितीलाच लागू पडतो.' (पाटणकर, १९९५, ९) 'आपला वर्चस्व सिद्धान्त सिद्ध करताना त्याची दृष्टी तत्कालीन राजकीय परिस्थितीत इटालियन सोशलिस्टांना ज्या समस्यांना तोंड द्यावे लागत होते' त्यापुरतीच मर्यादित होती. केवळ राजकीय-सामाजिक-आर्थिक संदर्भ असलेला हा सिद्धान्त आज साहित्याला लावण्यामुळे अनर्थच होऊ शकतो.

संस्कृतच्या वर्चस्वाचा प्रश्न येतोच कुठे, कारण आपल्यापैकी किती जणांना ही भाषा आणि हिच्यातील साहित्य परिचित आहे? गमतीची गोष्ट अशी की संस्कृतातील काही जुने साहित्यिक सिद्धान्त व आधुनिक टीकशास्त्रातील काही विचार यांच्यातील असलेले विलक्षण साम्य पाश्चात्त्य टीकाकारांनी दाखवून दिलेले आहे. उदा.- राजशेखर (९वे शतक) ने दोन प्रकारच्या प्रतिभेचा सिद्धान्त अकराशे वर्षांपूर्वी मांडला होता. 'भावयित्री प्रतिभा व कारयित्री प्रतिभा- म्हणजे काव्य लिहायला जशी प्रतिभा लागते तशी तिचा संपूर्ण आस्वाद घेण्यालाही. आधुनिक Reader Response Criticism या आजच्या सर्वमान्य टीका पद्धतीची येथे आठवण होते. पण आज आपण संस्कृतला हद्दपार केले आहे. वस्तुत: हे संस्कृतचे विस्मरण डॉ. देवी यांनी शोधून काढलेल्या विस्मरणापेक्षाही जास्त भयावह आहे!

आता राहिला प्रश्न इंग्रजीच्या वर्चस्वाचा. आधुनिक भारतीय भाषांतील कितीतरी वाङ्मय प्रकार– जसे सामाजिक कादंबरी व लघुकथा, वास्तववादी नाट्य– इंग्रजीतून घेतले गेलेले आहेत आणि केवळ जुलुमाचा रामराम म्हणून नक्कीच नव्हेत– नाहीतर स्वातंत्र्य मिळाल्याबरोबर तात्काल हे सारे वाङ्मय प्रकार इंग्रजांच्याबरोबर सातासमुद्रापार केले गेले असते. तेव्हा संस्कृत काय किंवा इंग्रजी काय यांच्या वर्चस्वाची संकल्पना म्हणजे केवळ शशशृंग (सशाच्या डोक्यावरचे शिंग) म्हणजेच अशक्यच असलेली गोष्ट आहे!

संस्कृतविषयीचा आणखी एक गैरसमज म्हणजे ती व तिच्यातील साहित्य फक्त उच्चभ्रू लोकांचे आहे. याउलट प्राकृत व भारतीय भाषा या जनसामान्यांच्या भाषा आहेत. परंतु जरी या भाषा संस्कृतातून निघाल्या असल्या तरी त्यांची आपल्या जननीशी जोडलेली नाळ कधीच कापली गेली नाही. याचे एक उत्तम उदाहरण म्हणजे संस्कृतातील टीकाशास्त्राची



अनुक्रमणिका

पंधराशे वर्षांची परंपरा- भरतमुनी (दोनशे ख्रि. पूर्व– दोनशे इ. स.) ते जगन्नाथ (सतरावे शतक इ. स.) याच्यापर्यंत पुढे प्राकृत व सर्व भारतीय भाषांना संपूर्णतया स्वीकारार्ह वाटली. इतकी की या भाषांत स्वतंत्र टीकालेखन अगदी विसाव्या शतकापर्यंत झालेच नाही, कारण संस्कृत टीकाशास्त्र त्यांना पुरेसे वाटले - ज्ञानेश्वर, तुकाराम, कबीर, तुलसीदास यांच्या साऱ्याच काव्यविषयक कल्पना संस्कृताधिष्ठित आहेत.

यावर असा आक्षेप घेतला जाईल की या कवींनी आपले स्वत:चे असे साहित्यशास्त्र निर्माण केले नसले तरी ते त्यांच्या स्वत:च्या साहित्यातून हुडकून काढता येईल. हा दावा किती फोल आहे हे प्रत्यक्ष उदाहरणे देऊन सिद्ध करता येईल. माझी उदाहरणे मराठी साहित्यातील आहेत कारण मराठी माझी मातृभाषा आहे; पण माझ्या अन्यभाषक मित्रांकडून मला समजले की, त्यांच्या, त्यांच्या भाषांची स्थिती वेगळी नाही. हे खरे की, मराठी संत कवींनी -विशेषत: ज्ञानेश्वरांनी संस्कृताऐवजी मराठीत रचना करण्यास सुरुवात केली कारण त्यांना सामान्य माणसांशी संवाद साधावयाचा होता. पण याचा अर्थ असा नव्हे की, त्यांनी संस्कृत परंपराच झुगारून दिली. उलट जनसामान्यांच्या भाषेत लिहून त्यांनी त्या परंपरेला अधिक विस्तृत रूप दिले.

आता **ज्ञानेश्वरीतून** काही नवे साहित्यशास्त्र निघते का हे पाहू या. दिलीप चित्रे म्हणतात, '**अनुभवामृत** हे एक संक्षिप्त स्वरूपातले साहित्यशास्त्र आहे. ज्ञानदेवांचा साहित्यविचार अभिनवगुप्त (इ. स. १० वे शतक) यांच्या साहित्यविचाराशी समांतर आहे. (चित्रे, १९९६,७) अशाच प्रकारचा प्रयास तुकारामांच्या बाबतीत केला तर हाती काय लागते ते पहा. तुकाराम म्हणतात, 'शब्द हा आमुच्या जिवाचे जीवन!...... शब्दची हा देव!' संस्कृतातील शब्दब्रह्माची कल्पना याहून काय वेगळी आहे? तसेच 'काय म्या पामरे बोलावी उत्तरे परि त्या विश्वंभरे बोलवीले' ज्ञानेश्वरांच्या सुप्रसिद्ध **पसायदानामध्ये** वेदातल्या 'सर्वेऽपि सुखिन: सन्तु'। या प्रार्थनेतला स्पष्ट पडसाद उमटलेला आहे. रामदास कवीचे वर्णन, 'कवी हे शब्दसृष्टीचे ईश्वर' असे करतात. **दासबोधातल्या** कवित्व लक्षण या समग्र समासात काव्यस्वरूपाविषयी असा नवा कोणताही विचार नाही की जो संस्कृत साहित्यशास्त्रकारांनी पूर्वीच सांगून ठेवलेला नाही.

किंबहुना या प्रश्नाकडे बघताना कोणतीही राजकीय व सामाजिक झापडे डोळ्यांना न लावता समतोल बुद्धीने पाहिले तर संस्कृत, प्राकृत व भारतीय भाषा यांच्या परस्परसंबंधात एक प्रकारचे अखंडत्व नजरेला येते. भक्तिमार्ग हा मध्ययुगीन मराठी काव्यातील सर्वांत महत्त्वाचा विषय आहे. या भक्तियोगाचा उगम वेदात सापडतो. देवाला जिवाचा जिवलग मित्र व परमप्रिय मानणाऱ्या तुकोबांनी वेद वाचले नव्हते, पण **ऋग्वेदात** परमेश्वराचे 'परमप्रिय मित्र' (८:८४:१) व 'जिवाचा सखा' (**ऋग्वेद** ८:९२, ३२) असे केलेले वर्णन भारतीय जनमानसात इतक्या प्रभावीपणे ठसले होते की, नंतरच्या काळात Osmosis च्या न्यायाने ती प्रवृत्ती समाजमनात खोलवर झिरपत गेली होती, असे म्हणावे लागते.

आर्ष हिंदू तत्त्वविचार असेच झिरपत जाऊन नंतर कुठे कुठे अवतरत राहिले हे पाहणे

मनोरंजक ठरावे. १८ व्या शतकात मराठीत लावणी हा प्रकार अतिशय लोकप्रिय झाला. उघडानागडा रांगडा शृंगार व स्त्री देहाचे लंपट वर्णन करणारे व प्रसंगी सद्‌भिरुचीचा कासटा फेडणारे हे काव्य आहे. पण त्यालाही हिंदू धर्म व तत्त्वविचार यांची पक्की बैठक आहे. 'कलगीवाले' 'तुरेवाले' हे दोन लावणीकारांचे पंथ. कलगीवाले प्रकृती, माया या तत्त्वाचे पाईक. ह्यांची लावणी 'भेदिक' म्हटली जाई. तुरेवाले ब्रह्मवादी, पुरुष तत्त्वाचे अनुयायी. ह्यांची लावणी वेदान्ती. जवळजवळ सर्वच लावणीकार शूद्र व अशिक्षित (याला रामजोशी, पठ्ठे बापूराव हे फार थोडे अपवाद) तरीही संस्कृतातील विचार समाजात किती खोलवर झिरपत गेले होते हे यावरून स्पष्ट होते.

विचारांकडून अभिव्यक्तीकडे वळले तर तिथेही तोच प्रकार! कालिदासाच्या **शाकुन्तलात** शकुन्तला चोळी दाटते म्हणून तक्रार करते, तशीच तक्रार लावण्यातल्या हजार नायिका करतात. 'चोळी दाटली अंगाला बाइ कापड का फाटलं' इत्यादी! भर्तृहरीच्या **शृंगार शतकात** (७ वे शतक) याहूनही मार्मिक असे उदाहरण सापडते. नायिका विरहाग्नीने पोळली असताना तिला चंद्राचे चांदणे देखील अती उष्ण वाटते इतके की साडीच्या पदराने ती, त्या चांदण्यापासून आपले रक्षण करते. (श्लोक २२) याप्रमाणेच ज्ञानदेवांच्या **विराणीतील** स्त्री, 'चंदनाची चोळी माझे अंग अंग जाळी' अशी नाजूक तक्रार करते. तसेच विरहामध्ये 'उष्ण चांदणे शीतल परि संगती।' असे रामजोशी म्हणतात. आणि मग हजार लावण्यातल्या विरहिणी याच सुरात विव्हळतात; हजार चोळ्या पोळत राहतात!

काव्याप्रमाणे मध्ययुगीन नाटकांवरही संस्कृतचा गाढा पगडा दिसून येतो. तमाशा, कृष्ण आणि गोपी ह्यांच्यातील परस्परसंवाद - कृष्णाची दही, दूध लोण्याची मागणी व गोपींनी त्याला दिलेला लटका नकार याशिवाय तमाशा सुरू होतच नाही. आता हा कृष्ण पंथ **भागवत** व जयदेवाचे **गीत गोविंद** (१३ वे शतक) यांतून आलेला आहे. लोकनाट्यात संस्कृतातील सूत्रधार हा असाच प्रारंभीचे कार्य पार पाडतो. मध्ययुगीन कन्नड लोकनाट्यात तो 'भागवत', 'नायक', 'कथेगारा' या नावांनी संबोधला जात असे. (नायकर, १९९६, ३८) तसेच संस्कृत विदूषक हा 'सारथी' किंवा 'कोंडगी' म्हणविला जाई. तसेच 'दप्पिनाटक' या कानडी लोकनाट्यात रामायण, महाभारत इत्यादीतील कथानके घेतलेली आहेत. काही नाटकांतून वेदान्त व इतर तत्त्वविचारही पात्रांतून मांडलेला दिसतो. (कित्ता, ६३, ६४) केरळातल्या कथाकली या नृत्य नाट्यात संस्कृतातील अनेक मिथ्य कथा अवतरतात. हे लोकनाट्यकार कुणी कालिदास वा भवभूती नव्हते. पण त्या महान नाटककारांनी ज्या पुरातन कथासागरातून आपली कथानके घेतली, त्याच जलाशयाच्या पाण्यात हे अनामिक लोकनाट्यकार डुंबलेले आहेत.

तेव्हा संस्कृत कालापासून थेट आजपर्यंत भारतीय साहित्य एक प्रकारचे अखंडत्व बाळगून आहे. हे अखंडत्व जीवनदृष्टी, विचारधारा, काव्य व काव्यविचार आणि अभिव्यक्ती या साऱ्यात आढळून येते. तेव्हा डॉ. देवी, 'विस्मरण, विस्मरण' असे 'अय् हसन्, अय हुसेन' या थाटात ऊर धोपटून ओरडतात, तेव्हा 'विस्मरण आणि ते कशाचे' असा प्रश्न

त्यांना विचारावासा वाटतो. खरी गोष्ट अशी की, कोणत्याही प्रकारचे विस्मरण खरोखरीच असले तर ते डॉ. देवी व डॉ. नेमाडे ह्यांच्या बाबतीतच आहे. संस्कृतचा व भारतीय भाषांचा संबंध किती जुना व किती जवळचा आहे याचे त्यांना विस्मरण झालेले दिसते. म्हणजे विस्मरणाची व्याधी तथाकथित रुग्णाला झालेली नसून या (विद्वान) वैद्यराजांना झालेली आहे. भारतीय साहित्याच्या परंपरेचा पुन्हा एकदा साकल्याने व समतोलपणे अभ्यास करणे हे एकच औषध त्यांनी नियमितपणे घ्यावे, म्हणजे देशीवादासारख्या अपरिपक्व संकल्पना नीट चावून न खाल्ल्यामुळे त्यांना झालेले वैचारिक अजीर्ण दूर होईल!

## संदर्भ

डॉ. एम्. के. नाईक : ४, रचना क्लासिक, गुलमोहर पार्क, औंध, पुणे– ७


गार्डनर, हेलिन् — इन् डिफेन्स ऑव्ह द इमॅजिनेशन लंडन ओयूपी; १९८२

तुकाराम — गाथा : स. के. नेउरगावकर, पुणे : आचार्य दांडेकर प्रकाशन, १९७८

देवी, गणेश — आफ्टर ॲम्नेशिया : ट्रडिशन अँड चेंज इज इंडियन लिटररी क्रिटिसिजम, मुंबई : ओरिएंट लॉग्मन, १९९२

नायकर, बी. एस्. — द फोक थिएटर ऑव्ह कर्नाटका, धारवाड; प्रसारंग, कर्नाटक विद्यापीठ १८९६

नेमाडे भालचंद्र — 'द कॉन्सेप्ट ऑव्ह नेटिव्हिझम,' न्यू क्वेस्ट मे-जून १९८४.

परांजपे, मकरंद — नेटिव्हिझम : एसेज, इन क्रिटिसिझम: नवी दिल्ली: साहित्य अकादमी, १९९७.

पाटणकर, रा. भा. : 'सम् पर्सेप्शन्स ऑव्ह द अँग्लो-मराठी एन्कौटर', न्यू क्वेस्ट जानेवारी - फेब्रुवारी १९९५

रामदास — दासबोध. संपादक के. वि. बेलसरे, सातारा. समर्थ सेवामंडळ, १९७५

सेतु — जर्नल ऑव्ह इंडियन लिटरेचर इन ट्रान्सलेशन् १० क्र. १, एप्रिल-जून २००२.

ज्ञानेश्वर — ज्ञानेश्वरी. संपादक वि. ना. जोशी (साखरे महाराज) व किरणमहाराज साखरे, पुणे : यशोधन प्रकाशन, १९९१


**टीप :** मला **'पुरेसे मराठी'** येत नसल्याचे शिफारसपत्र मला साहित्य अकादमीच्या मराठी सल्लागार समितीच्या (विद्वान) अध्यक्षांकडून मिळालेले आहे. तरी वरील लेखनातील भाषेच्या चुका 'तरी न्यून ते पुरते..... या 'ज्ञानेश्वरी न्यायाने' वाचकांनी पोटात घालाव्यात ही विनंती!

❑

# डॉ. गंगाधर बळवंत ग्रामोपाध्ये यांचे लेखनविश्व



**डॉ. सु. म. तडकोडकर**

**जीवनपरिचय**

डॉ. ग्रामोपाध्ये यांचे मूळ घराणे महाराष्ट्रातील अक्कलकोट येथले. गं. बं. चे तीर्थरूप कालवश झाल्यानंतर थोरल्या भावाने साऱ्यांना पुण्यातल्या सोमवार पेठेत आणले, त्यामुळे त्यांचा अक्कलकोटकडचा संबंध त्यांच्या वयाच्या तिसऱ्या वर्षीच सुटला. थोरल्या भावाला जरी वाङ्मय, नाटक, गायन अशा कलांची आवड असली तरी त्याने व त्याच्या दुसऱ्या भावाने उपाध्येचा व्यवसाय स्वीकारला व गं. बं. ना त्यांच्या शालेय अध्ययनासाठी मोकळे ठेवले. नगरपालिकेच्या विद्यालयात तिसरीपर्यंतचे शिक्षण पूर्ण झाल्यानंतर महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार ज्या शिक्षण प्रसारक मंडळीच्या नूतन मराठी विद्यालयात मुख्याध्यापक होते तिथे गं. बं. चे अध्ययन झाले. त्या संस्थेत त्या काळातले दिग्गज विद्वान श्री. म. माटे (इंग्रजी), के. ना. वाटवे व गणेश लेलेशास्त्री यांचे पुत्र लक्ष्मणशास्त्री लेले (संस्कृत) अध्यापन करीत. साहजिकच मॅट्रिक्युलेशनपर्यंत रघुवंश, रामायण व अभिज्ञान शाकुंतलम्‌चे वाचन होऊ शकले. पुढे सर परशुरामभाऊ महाविद्यालयात इंटरमिडिएटपर्यंतचे अध्ययन झाल्यानंतर इंग्रजीतील ऑनर्ससाठीचा अभ्यासक्रम पूर्ण करण्यासाठी गं. बं. नी वाडिया महाविद्यालयात प्रवेश घेतला. त्यांच्या काळात महाविद्यालयात इंग्रजी अध्ययन-अध्यापनाच्या स्तर बहुधा उत्तम प्रकारचा असावा. आजही सर पशुरामभाऊ वा फगर्सन ही महाविद्यालये इंग्रजी अध्ययन-अध्यापनाच्या स्तराविषयी विशेष प्रशंसेला पात्र ठरली आहेत. त्या वेळी बी. ए. ला मराठीच्या दोन, इंग्रजीच्या दोन शिवाय अनिवार्य इंग्रजीच्या दोन अशा प्रत्येकी शंभर गुणांच्या सहा प्रश्नपत्रिका सोडवाव्या लागत. त्याशिवाय इंग्रजीतील ऑनर्ससाठीच्या अभ्यासक्रमासाठी प्रत्येकी दीडशे गुणांच्या आणखी तीन प्रश्नपत्रिका सोडवाव्या लागत. तिथेही अध्यापनक्षेत्रातील रथी-महारथी म्हणावीत अशी आर. सदाशिव अय्यर, ग. ह. केळकर, प्राचार्य खाड्ये ही मंडळी होती. अरविंद मंगरूळकर, ना. मा. संत यांसारखे त्यांचे सहाध्यायी होते. रविकिरण मंडळाचा प्रभाव होताच, यशवंत व माधव जूलियन आवडत. प्रल्हाद केशव अत्रे, गं. भा. निरंतर, गोपीनाथ तळवलकर यांनी शारदोपासक मंडळाचे पुनरुज्जीवन करून शारदोपासक संमेलने आयोजित करण्यास आरंभ केला होता. वामन

मल्हार जोशी, नरसिंह चिंतामण केळकर यांच्या कर्तृत्वाचा परिचय होऊ लागला होता. व्याख्याने, सभासंमेलने, वादविवाद यांसारखे कार्यक्रम पुण्यातल्या युवकांना वैचारिक व वाङ्मयीन क्षेत्रांत समृद्ध बनवीत होते. फडके, खांडेकर हे लोकप्रिय होत होते; परंतु एकंदर घरावरच आर्थिक परिस्थितीचे सावट असल्याने गं. बं. ना चित्रपट, नाटक वगैरे वर्ज्य हाते. इतके की मातोश्रींच्या आजारीपणामुळे गं. बं.ना ऑनर्सचा अभ्यासक्रम पूर्ण करता येणे शक्य नसल्याने ऐनवेळी ते केवळ उत्तीर्ण स्तरावरील परीक्षेला सामोरे गेले (१९३४), ज्या दिवशी बी. ए.च्या पहिल्या प्रश्नपत्रिकेसाठीची परीक्षा होती त्याच दिवशी त्यांच्या मातोश्रींच्या निधनानंतरचा चौदावा दिवस होता. परिणामी एम. ए. ला मराठी हा विषय स्वीकारावा लागला. तत्पूर्वी त्यांनी भावे विद्यालयात अध्यापनाच्या कार्यास वाहून घेतले.

गं. बं.नी वाडिया महाविद्यालयातच एम. ए.ला सुप्रसिद्ध भाषाभ्यासक डॉ. पी. एल. वैद्य यांच्या मार्गदर्शनाखाली भाषाशास्त्राचे अध्ययन करण्याचा निर्णय घेतला. नरसिंह चिंतामण केळकर हे त्या काळातील पीएच. डी. च्या विद्यार्थ्यांसाठीचे एकमेव मार्गदर्शक प्राध्यापक होते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली मराठीतले पहिल्या फळीतले पीएच. डी.चे विद्यार्थी म्हणून डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, डॉ. म. अ. करंदीकर, डॉ. शं. गो. तुळपुळे व चवथे डॉ. गंगाधर बळवंत ग्रामोपाध्ये यांचा नामनिर्देश होतो. गं. बं.च्या 'पेशवे दप्तरातील मराठी भाषेचे स्वरूप' या १९४०त विद्यापीठाला सादर केलेल्या प्रबंधाचे प्रकाशन त्यांचे सहाध्यायी ज. शां. मेढेकर यांनी १९४१त केले. ग. बं. नी के. नारायण काळे यांच्या संपादकत्वाखालील महाराष्ट्र साहित्य पत्रिकेसाठी पुस्तक परीक्षणे व वार्षिक साहित्य समालोचने लिहिली.

पीएच. डी.च्या पदवीचा लाभ मिळाल्यानंतर साहजिकच त्यांना विद्यालयीन क्षेत्रातल्या अध्यापनापेक्षा महाविद्यालयीन अध्यापनात रस घेण्याची इच्छा होऊ लागली. पुण्यातल्या सर परशुरामभाऊ, फर्गसन व वाडिया या इन-मीन-तीन महाविद्यालयांत संधी मिळण्याची शक्यता नव्हती. बेळगावातल्या लिंगराज महाविद्यालयात अध्यापन करण्याची संधी मिळताच ते तिथे गेले. १९४३ पासून १९५१ पर्यंत गं. बं. चे बेळगावात वास्तव्य होते.

**मराठी साहित्यविषयक प्रश्नांत रस :**

जरी पुण्यात असताना गं. बं.नी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेतून मनसोक्त लेखन केले तरी बेळगावच्या सांस्कृतिक वातावरणातील वेगळेपणात वावरत असताना त्यांनी वाङ्मयविषयक प्रश्नात रस घेऊन त्यांची उत्तरे शोधण्यातून लेखन केले. त्या काळात तिथल्या परिसरात ना. मा. संत, इंदिरा, विंदा करंदीकर, वि. म. कुलकर्णी, शालिनी सोमण, संजीवनी, वि. गं. देशपांडे ही अध्यापन क्षेत्रातली मंडळी भेटली. 'मधुपर्क'कार पुरुषोत्तम मंगेश लाड प्रांताधिकाऱ्याच्या पदावर कार्यरत असताना त्यांच्या निवासस्थानी साप्ताहिक संमेलन होत होते. कविवर्य बाळकृष्ण भगवंत बोरकरांचे आपल्या बंधूपाशी आगमन होत असे. त्यांचा सहवासही महत्त्वाचा होताच. याच सुमारास कवितालेखनही होऊ लागले. वाङ्मयविषयक प्रश्नांची उत्तरे शोधण्याच्या दिशेने जाऊन स्वतंत्रपणे विचार करण्यासाठी साध्य करण्यास लिंगराज



अनुक्रमणिका

महाविद्यालयाच्या ग्रंथालयातील इंग्रजी ग्रंथविभाग विशेष कारणीभूत ठरला. त्यांच्यावर टी. एस. एलियटचा प्रभाव पडू लागला होता. एझरा पाऊंड, स्टिफन स्पेण्डर वगैरेंची कविता भिडू लागली होती. त्यांना श्री. म. माटे, ना. सी. फडके यांच्यासारख्यांच्या व्याख्यानांचे कार्यक्रम आयोजित करता आले. वा. ल. कुलकर्णी, वा. रा. ढवळेसारख्यांकडून मुंबई-पुणे येथील वाङ्मयीन व्यवहाराचा इतिवृत्तांत कळत असे. अरविंद याळगी व कमल देसाई हे आजचे सुपरिचित साहित्यिक गं. बं.चे विद्यार्थी होते. या व इतर विद्यार्थ्यांची जिज्ञासा पाहून त्यांच्याशी झालेल्या चर्चांतून लेखन आकारू लागले होते. त्यांनी ॲरिस्टॉटलच्या पोएटिक्सचे भाषांतरही करण्याचा प्रयत्न केला. 'सत्यकथा'तूनही लेखन प्रसिद्ध होऊ लागले होते. या साऱ्या अनुभवांतून बाळ सीताराम मर्ढेकर याच्या काव्यकर्तृत्वाचे स्वागत करण्याइतपत आत्मविश्वास आला होता.

**साहित्यलेखनविषयक भूमिका :**

येथवर गं. बं. ची वाङ्मयविषयक भूमिका स्थिर होऊ लागली होती. 'वाङ्मयीन मूल्ये आणि जीवनमूल्ये' हे या भूमिकेचे पहिले अपत्य होय. किंबहुना या पुस्तकाच्या शीर्षकातच त्या भूमिकेचे उद्घाटन झालेले दिसेल. वाङ्मयकला ही कल्पनानिर्मित असते, ती स्वायत्त असते, परंतु ती जीवनानुभवातून साकार होत असल्याने तिचे प्रयोजन जीवनाशी संबंधित असते. यातून गं. बं. नी जीवनासाठी कला व कलेसाठी कला या वादग्रस्त विचारात सुवर्णमध्य साधला जाईल अशीही सोय पाहिली. जीवनानुभवाच्या आशयानुरूप वाङ्मयकला व्यक्त होते, परंतु जरी ती वास्तवतेशी नाते सांगत असली तरी ती अंततोगत्वा काल्पनिक निर्मिती असल्याने स्वतंत्र असते. मूल्यांच्या संदर्भात विवेचन करायचे असल्यास जीवनमूल्ये व वाङ्मयीन मूल्ये काही अंतरापर्यंत पृथक्‌पणे पण समांतरपणे प्रवास करताहेत असे जरी वाटले तरी अंतिमत: कुठल्या तरी बिंदूपाशी एकरूप होतात. जीवनानुभव ज्या वेळी शक्यता व संभवनीयता यांच्या सहकार्याने बौद्धिक पातळीस स्पर्श करू लागतो त्या वेळी जीवनातील शाश्वत मूल्यांचे आकलन होऊ लागते. हे आकलन झाले की मानवी अस्तित्वाविषयीच्या जाणिवांचा व्यास विस्तारू लागतो. येथे मनाचे विरेचन होऊ लागते. मन विशुद्ध होऊ लागते. त्यातून अत्यंत उच्च स्तरावरचा आनंद अनुभवण्याचा क्षण येतो. म्हणून केवळ फॅक्टसवर हॅमर करीत राहणे वा केवळ फॉर्मसाठीचा धोशा लावणे या दोन्ही वाङ्मयीन संप्रदायांतील कृतीमुळे सकस साहित्याच्या निर्मितीला ढळ पोहोचवतात असे म्हणून गं. बं. नी केवळ आशयाचा केवळ अभिव्यक्तीचा आग्रह न ठेवता विचारातले अडथळे , संघर्ष टाळता येतात हे दाखवून दिले. किंबहुना गं. बं.नी या प्रकारच्या केवल समन्वयवादाचा पुरस्कार केला असे म्हणता येते. असे असले तरी त्यांच्या पुरस्काराचा त्यांनी पाठपुरावा केला असे म्हणता येईलसे वाटत नाही. त्यांचे वाङ्मयानंदाविषयीचे विवेचन अधिक सूक्ष्म प्रकारचे आहे. वाङ्मयाच्या निर्मितीचा तसेच आस्वादाचा आनंद केवल स्वरूपाचा असला तरी त्यात जीवनमूल्यांचे दर्शन होते. किंबहुना तोच जीवनमूल्यांचे दर्शन घडविणारा आनंद

श्रेष्ठ प्रतीचा ठरतो, असे गं. बं.ना वाटे.

पुढे गं. ब. १९५१त मुंबईत खालसा महाविद्यालयात अध्यापनकार्यासाठी आले. मुंबईचे सांस्कृतिक वातावरण पुणे व बेळगाव येथील वातावरणापेक्षा खचितच वेगळे होते. चित्र, शिल्प, नाट्य, पाश्चात्त्य वाङ्मय व ललित कलांच्या माध्यमांतून होणारे नवनवीन प्रयोग व ज्ञात होणारे मतप्रवाह यांच्याशी परिचित होण्याची संधी त्यांना मिळाली. अल्काझींच्या थिएटर-युनिटने सादर केलेली नाटके पाहिली. स्वत:चे कलागुण सादर करण्याची आवश्यकता असल्याचे विद्यार्थ्यांना पटवून देता येणे शक्य झाले, त्यातून कमलाकर नाडकर्णी व हेमू अधिकारी यांची 'बहुरूपी' ही प्रायोगिक नाट्यसंस्था जन्माला आली. गं. ब. अनेक वर्षे या संस्थेच्या अध्यक्षपदी होते. त्यांच्या संस्थेच्या नाटकाला १९६५ मध्ये राज्य पुरस्कार देखील लाभला होता. त्यांना ऑस्टिन वॉरेन व रेने वेलेक या द्वयीच्या लेखनाचे महत्त्व कळाले ते येथेच. आणि न्यू क्रिटीसिझमचेही अग्नित्व जाणवू लागले. अतिशय समृद्ध ग्रंथालयांचे सान्निध्य तर बव्हंशी लाभदायकच ठरले. त्यामुळे त्यांचा मुळातच निकोप असलेला दृष्टिकोन ठामपणे मांडला जाऊ लागला.

**संतसाहित्याचे अध्ययन :**

गं. बं.नी भाषाशास्त्राच्या अभ्यासासोबत संतसाहित्याचेही अध्ययन केले. कथा, कीर्तने. पुराणे व प्रवचने ऐकण्याची आवड असल्याने त्यांनी स्वत:च्या घरातील पोथ्यांचे वाचन केले. म. म. पोतदारांच्या सहवासात ऐतिहासिक दृष्टी बाळगण्याचे पाठ मिळाले. पोतदार जरी पाठभेदाची चर्चा करीत नसले तरी ज्ञानेश्वरीच्या अनेक प्रतींच्या आधारे अर्थ लावीत. त्यामुळे गं. ब. बहुश्रुत झाले. त्यामुळे चमत्कार, आख्यायिका, वगैरे टाळून संतांच्या चरित्राला व तत्त्वज्ञानाला कसे भिडायचे याविषयीची दृष्टी लाभली. त्यातून स्वत:ची संतसाहित्याविषयीची भूमिका निश्चित होत गेली. संतांनी केवळ काव्य म्हणून रचना केली नाही. त्यामुळे त्यांच्या काव्याचा विचार करताना तत्त्वज्ञानाचे अंगही ध्यानात घ्यावे लागते. वामन मल्हार जोशी वा विभावरी शिरूरकर यांच्या कादंबऱ्यांची प्रकृती एक नव्हे. त्यांचा विचार करताना जसा वेगळा दृष्टिकोण हवाच तसे संतकवींबद्दलही वेगळा ठेवणे आवश्यक आहे अशी भूमिका निश्चित केली. त्यांना वासुदेव बळवंत पटवर्धन, केळकर यांच्या प्रभावामुळे संतांच्या काव्याचे आधुनिक दृष्टिकोनातून रसग्रहण करावेसे वाटले. दासो दिगंबर वा महीपती तसेच विनायक लक्ष्मण भावे व पांगारकर यांनी केलेले संतचरित्राचे लेखन बाजूला ठेवून संतांच्या अभंगलेखनातूनच त्यांचे चरित्र व तत्त्वज्ञान यांचा शोध घ्यावा या भूमिकेतून त्यांनी जनाबाईच्या अभंगांवर 'रागिणी' मासिकातून एक लेखही लिहिला. 'त्यातून संतकाव्यसमालोचन' करण्याची प्रेरणा लाभली. त्यानुसार ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम यांच्यावर काहीही न लिहिता जनाबाई, चोखामेळा, सावता माळी ही ज्ञानेश्वरांची प्रभावळ डोळ्यांसमोर ठेवून लेखन केले.

गं. बं.च्या मते संतसाहित्याचे वेगळे साहित्यशास्त्र निर्माण करण्याची आवश्यकता नाही कारण भक्ती हा एक स्वतंत्र रस आहे व मध्यवर्ती प्रमाण रसव्यवस्थेत तो सामावू शकतो.

संतमंडळींत रामदासांना साहित्यशास्त्राची अधिक जाणीव असल्याचेही त्यांनी प्रतिपादिले. विरहिण्या वा तुकारामाचे काही आत्मपर अभंग, 'तुज सगुण म्हणू की निर्गुण रे' यासारखे ज्ञानदेवांचे अभंग पाहिले तर त्या रचनांसमोर श्रोता उपस्थित नाही हे ध्यानात घेतले पाहिजे. जनाबाईचे काही अभंग साक्षात्कारासारखे आहेत. त्यात देव आपल्याबरोबर खातो-पितो, दळू लागतो, लुगडी धुतो हे सारे तिच्यापुरते खरेही आहे, पण सामान्यपणे तसा अनुभव येईपर्यंत तो इतरांना आभासच वाटेल. असे काही लेखन स्वान्तः सुखाय असू शकते. पटवर्धनांनी संतवाङ्मयाला आध्यात्मिक भावगीते असे संबोधले. पण नामदेव-एकनाथांसमोर मात्र श्रोता होता. संतांना आध्यात्मिक भूमिकेपुरतीच सामाजिक समता अभिप्रेत होती. संतांनी त्यांच्या काळातील सनातनी समाजाशी संघर्ष करून स्त्री-पददलितांसाठी मोक्षाचा मार्ग उघडून दिला. ही कृती म्हणजे संतांनी केलेली क्रांतीच होय, असे गं. बं.ना वाटे. कोणत्याही बाबीचे मूल्यमापन त्या त्या काळाच्या चौकटीतच करायचे असते. संतांनी केवळ सैद्धान्तिक स्तरावरचे क्रांतिकारी विचार मांडत न राहता प्रत्यक्षात समाजातील आध्यात्मिक कोंडी फोडली व ते कार्य म्हणूनच महत्त्वाचे ठरते.

**मराठीच्या व्याकरणाविषयीचा दृष्टिकोन :**

डॉ. ग्रामोपाध्ये दरम्यान खालसा महाविद्यालयातून मुंबईतल्याच विल्सन महाविद्यालयात (१९६०) गेले आणि पुढे यथावकाश निवृत्त झाल्यानंतर तेथून ते गोव्यातील (१९७०) मुंबई विद्यापीठाच्या पणजी येथील पदव्युत्तर अध्ययन व संशोधन केन्द्रात राहून पुढील सात वर्षं अध्यापन केले. मी १९७३-७५ या काळात यांच्या मार्गदर्शनाखाली एम. ए. करीत होतो. ते भाषाभ्यासक होते अन् 'भाषाविचार व मराठी भाषा' या पुस्तकाचे लेखक होते. त्यांनी भाषाशास्त्रांतर्गत अभ्यासक्रमाचे अध्यापन केले. तेव्हा व्याकरणावरील अभ्यासक्रमांतर्गत चर्चा झडत.

गं. ब. आपल्या मतांशी नेहमीच ठाम राहिले. त्यांनी नेहमी भाषेचा अभ्यास, भाषेच्या वृद्धीसाठी असायला हवा असेच मानले होते. व्याकरणविषयीचा विचार हा भाषेच्या विकासाचा अभ्यास होय असे ते म्हणत. त्यामुळे मराठीच्या व्याकरणाविषयीचा दृष्टिकोन व्यक्त करताना प्रा. मंगरूळकरांनी पुनर्विचाराची आवश्यकता प्रतिपादिली अन् तिचा गं. बं. नी नेहमीच पुरस्कार केला. त्यांच्या मतानुसार मराठीची पहिली व्याकरणे संस्कृत चौकटीतीलच होती. राजवाडे यांनी ज्ञानेश्वरीतील व्याकरणाचा विचार संस्कृतच्या धर्तीवर केला. दादोबांनी त्या विचाराला इंग्रजीच्या वळणावर नेऊन ठेवले. रा. भि. जोशींवरही इंग्रजीचा प्रभाव आहेच. मराठी भाषेच्या व्याकरणाचा तिची प्रकृती लक्षात घेऊन प्रा. मंगरूळकरांनी पहिल्यांदा विचार केला. अन् हे असे करणे काळाची गरज ठरते.

गं. बं.च्या मते कृ. श्री. अर्जुनवाडकरही प्रा. मंगरूळकरांसारखेच. डॉ. अशोक केळकरांकडून, त्यांच्या मराठीच्या भाषाशास्त्राच्या अभ्यासामुळे गं. बं.ना खूप अपेक्षा होत्या. मराठीच्या बोलींच्या संदर्भातही असा विचार करता येणे शक्य आहे अन् असे प्रयत्न भरघोसपणे

व्हायला हवेत. पण विद्यापीठातील अध्ययन व अध्यापनात भाषा व साहित्य ही दोन स्वतंत्र क्षेत्रे असतात हे वास्तव ध्यानात न घेतल्याने एकाच प्राध्यापकाला स्वत:च्या अध्यापनात सारे विषय सामावून घ्यावे लागतात अशी ते खंत व्यक्त करीत.

**बखरींच्या अभ्यासाविषयीचा पुनर्विचारः**

मी नेहमी गं. बं.ना बखरींचा समावेश लोकसाहित्यात का केला जाऊ नये असे विचारत असे. बखरींवर गं. बं.चा स्वतंत्र अभ्यास होता. त्या विषयात त्यांची स्वत:ची निरीक्षणे होती. या प्रांतात त्यांची मिरासदारी होती. म्हणून जसे गं. बं.नी व्याकरणाचा विचार पुनश्च व नव्याने व्हायला हवा असे मत मांडले, तसे बखरींचाही पुनर्विचार व्हायला हवा असेही सातत्याने म्हटले. त्याविषयीची कारणे देताना ते म्हणत की पुढील पिढ्यांना मार्गदर्शन व्हावे म्हणूनच तर या बखरी दिल्या आहेत. बखरी या पूर्णपणे ऐतिहासिक नव्हत. त्यात दंतकथाही येतात, परंतु एक गद्यात्मक लेखनाचा प्रकार म्हणून बखरींचा अभ्यास करताना तो शुद्ध कल्पनात्मक वाङ्मयप्रकार आहे असे मात्र म्हणता येणार नाही. तो एक स्वतंत्र लेखन प्रकार आहे. ९१ कलमी व सभासदी बखर यांचा विचार वेगळ्या पद्धतीने करता येतो. नायकाच्या गौरवात धन्यता मानणाऱ्या पौराणिक व ऐतिहासिक युद्धाच्या बखरी, चरित्रात्मक बखरी या ऐतिहासिक कादंबरीशी निकट आहेत. रितोर्पाज क्रॉनिकल म्हणूनही पानिपतच्या बखरीची दखल घ्यावी लागते. शिवाय भाषाप्रभुत्वाचे उदाहरण म्हणूनही बखरींना महत्त्व लाभते ते वेगळेच. वंशावळ, ऐतिहासिक घटनांतील फलश्रुती, फारशी तवारिखांची वैशिष्ट्ये अशा विविध दिशाही अभ्यासासाठी उपलब्ध होऊ शकतात.

**दलित साहित्याविषयीचा दृष्टिकोन :**

गं. बं.नी दलित साहित्याचे स्वागत झाले, त्याविषयीचे समाधानच व्यक्त केले. या प्रकारच्या लेखनामुळे मध्यवर्ती मराठी साहित्य समृद्धच झाले आहे, असे त्यांचे मत होते. प्रत्येकाच्या आयुष्यातील भोगवट्यालाही वाङ्मयीन सौंदर्याचे वलय लाभलेले असते. ते नेमकेपणाने दाखवता आले पाहिजे. धड कल्पित कथा नाहीत की धड सत्येही नव्हत, अशीच आत्मचरित्रे मराठीत अधिक आहेत. 'स्मृतिचित्रे'सारखी क्वचितच. सत्य, त्यातही संपूर्ण सत्य, सांगावे अशी आपली अपेक्षा असली तरी ते फार कठीण असते. किंबहुना नावनिशीवार उल्लेख, बदनामी, भावना दुखावणे इत्यादीमुळे सत्यवादी आत्मचरित्रे लिहिली जाणे अशक्यच होय. स्टीफन स्पेण्डरने अशा प्रकारच्या नोंदींना वर्ल्ड वुईदिन वर्ल्ड असे म्हटले आहे. स्त्रियांची काही आत्मचरित्रे मोकळेपणाने लिहिली गेली आहेत. दलित आत्मकथनांमुळे मराठी साहित्यविश्व अधिक समृद्ध झाले; परंतु अशा प्रकारच्या लेखनाला काही अंगभूत मर्यादा असतात कारण काही अनुभव एकाच्या वाट्याला येतात ते दुसऱ्याला मांडता येणार नाहीत, असे जरी वास्तव असले तरी ते अनुभव फार काळ पुरणार नाहीत, केवळ विद्रोहाचे साधन म्हणून या साहित्यनिर्मितीचे पर्व आता मागे पडले आहे. अरुण साधूंच्या 'त्रिशंकू'मुळे

दलितांच्या पुढच्या पिढीच्या समस्या दाखवून या प्रकारच्या लेखनाची एक दिशा उपलब्ध होते. सत्य घटना आणखी हव्यात व त्या येतीलही. परंतु त्यामुळे वाङ्मयीन श्रेष्ठत्व लाभेलसे नाही म्हणून यापुढे लेखकांनी कलात्मकतेकडेही लक्ष द्यायला हवे असा गं. बं.नी आग्रह धरला. येता-जाता केवळ सत्य घटनांचीच अपेक्षा बाळगून समीक्षकांनीही त्या लेखकांचा गैरसमज करून देता कामा नये. कलात्मकतेच्या मांडणीत वेगळेपणा यायला हवा. त्यासाठी नव्या मिथ्स निर्माण कराव्या लागतील अन् त्या त्यांच्या जीवनानुभवातूनच अंकुरून आल्या पाहिजेत. बौद्ध मिथ्यकांकडेही वळता येइल. मध्यवर्ती मराठी वाङ्मयपरंपरा सुदृढ करण्याची दृष्टी बाळगूनच हे लेखनकार्य साधता येईल. या साहित्याला पृथक कलामूल्ये लावायला हवीत असे म्हणण्याला तसा अर्थ नाही. गंभीर प्रकृतीच्या वाचकाला काही पुस्तके पुन्हा पुन्हा वाचायला का आवडतात? शेले, दोस्तोव्हस्कीपाशी आपण अनेक वेळा का वळतो? हे समीक्षकांना कोणीतरी विचारले पाहिजे व समीक्षकांनीच त्याचे उत्तर दिले पाहिजे. गं. बा. सरदार, वा. ल. कुलकर्णी व सरोजिनी वैद्य यांच्या वाङ्मयविषयक दृष्टिकोनालाही समजून घण्याची आवश्यकता आहे. एकंदरीतपणे गं. बं.नी मांडलेले विचार अशा स्वरूपाचे आहेत.

**ऐतिहासिक साहित्यकृतिविषयक विचार :**

गं. बं.नी ऐतिहासिक कादंबरी व ऐतिहासिक नाटक यातील ऐतिहासिक या संज्ञेस व्यवच्छेदक लक्षण न मानता या संज्ञेस केवळ ते विशेषण असल्याचे मानावे असे प्रतिपादिले. ऐतिहासिक साहित्यकृतींच्या माध्यमातून नवनवीन अर्थांतरे (इंटरप्रिटेशन्स) करून दाखवता येणे शक्य आहे. ऐतिहासिक सत्ये बदलण्याचा अधिकार साहित्यिकांना नाही पण ऐतिहासिक साहित्यकृतीतील ऐतिहासिक व्यक्तिरेखांचे दर्शन वेगवेगळ्या पद्धतीने तसेच प्रतीकात्मकतेने दाखवता आल्यास त्या व्यक्तिरेखांना वैश्विक स्तरावरील व्यक्तिमत्वाच्या स्वरूपात प्रदर्शित करता येणे शक्य आहे, उदाहरणार्थ इंग्रजी साहित्यातील सेंट जोनचे चित्रण विविधतेने सादर केले गेले आहे. या अशा प्रयोगांमुळे कादंबरी वा नाटक म्हणून साहित्यप्रकारांचे वाङ्मयीन मूल्यमापन करता येणे शक्य आहे असे ते सांगत.

**वाङ्मयेतिहासलेखनविषयक विचार :**

गं. बं.नी वाङ्मयेतिहासात तत्त्वज्ञान वा त्याचा इतिहास याविषयीची नोंद महत्त्वाची नसून वाङ्मयनिर्मितीविषयक नोंद महत्त्वाची असल्याचे मानले. वाङ्मयेतिहासाचे लेखन करताना एका हाती लिहिणे शक्य नसेल तर टीमवर्कमुळे ते शक्य असते. ही टीम एका विचाराची असायला हवी. वेलेक, विम्सट हे एक हाती इंग्रजी टीकावाङ्मयाचा इतिहास लिहू शकतात. आपल्याकडे टीकावाङ्मयाचा इतिहास नाही. आपल्याकडे पूर्वग्रहाचा पगडा आहे. वाङ्मयीन दृष्टीही एकारलेली आहे. ग्रंथकार एक की दोन यावरील तळटीपेतील नोंद आवश्यक असली तरी त्या संदर्भातील तपशीलवार विवेचन विशेष महत्त्वाचे नसते. आपल्याकडे

जुन्या वाङ्मयाच्या शुद्ध संहिता अद्याप उपलब्ध नाहीत. त्यासाठी ऑथर स्टडीज, पिरिएड स्टडीजसारखे प्रकल्प उभे राहिले पाहिजेत. प्राचीन वाङ्मयाचा इतिहास लिहिताना सांप्रदायिक वा इतर प्रकारच्या वाङ्मयलेखनाची प्रकृती, वृत्ती व प्रवृत्ती त्या वाङ्मयाचे प्रयोजन ध्यानात घेणे क्रमप्राप्तच ठरते. परंतु तत्त्वज्ञान व संप्रदाय यांचा इतिहास किती द्यायचा याविषयीचे तारतम्य हवे. सांप्रदायिक साहित्याचा आलेख किती खाली-वर गेला याचे निश्चित दर्शन व्हायला हवे. संत वाङ्मयाच्या संदर्भात कदाचित त्याविषयीची नोंद काहीशी क्षम्य ठरली तरी पंत व तंत काव्याच्या संदर्भात ती गौण ठरते. कालगणनेत सुसूत्रता हवी. अर्वाचीन वाङ्मयाची निर्मिती महत्त्वाची या मुद्द्यावर गं. बं.नी नेहमीच जोर दिला.

गं. बं.च्या निरीक्षणानुसार मराठीत वाङ्मयेतिहासाशी संबंधित जे काही ग्रंथलेखन झाले त्यात लक्ष्मण रामचन्द्र पांगारकर हे भाविक इतिहासकार तर विनायक लक्ष्मण भावे हे त्या मानाने किंचित चिकित्सक वाटतात, परंतु वाङ्मय म्हणजे काय याची कल्पना त्यांना नसावी. ती कल्पना गंगाधर बाळकृष्ण सरदार व बेडेकर यांना होती. अ. ना. देशपाण्डे यांचे पूर्वग्रह ठाम. रा. श्री. जोगांची दृष्टी संस्कृत वाङ्मयीन अभिरुचीवर पोसलेली होती हे त्यांच्या मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकनमध्ये जाणवते तर मराठी वाङ्मयेतिहासाचे जे खंड त्यांनी संपादित केले त्यावर कादंबरी, लघुकथा असा वाङ्मयप्रकारानुसार पॅटर्न घेताना महत्त्व कशाला द्यायचे याविषयीचे तत्त्व कोणते हे स्पष्ट होत नाही. या पार्श्वभूमीवर ह. श्री. शेणोलीकर यांनी लिहिलेला प्राचीन वाङ्मयाचा इतिहास हाच एक या दृष्टीने चांगला प्रयत्न आहे असेही त्यांचे निरीक्षण होते.

या बैठकीवरून साकारलेली गं. बं.ची तुलनात्मक अध्ययन करण्याची पद्धतही ध्यानात घेता येते. मराठी कवितेचा, तिच्यातील पूर्वपरंपरेच्या धाग्याचा विचार आधिक्याने झाला पाहिजे. त्यांच्या मते केशवसुतांच्या 'तुतारी'चा व 'नवा शिपाई'चा इंग्रजीतील मार्चिंग साँगशी संबंध आहेसा वाटतो त्याहूनही तो पोवाड्याशी अधिक आहे. ग़ं. बं.ना केशवसुतांच्या कवितेतील सामाजिक आशय व गूढगुंजनपर कवितांचा धागा मराठी पोवाडे व आध्यात्मिक अनुभवाच्या अभंगवाणीशी जुळतो असे वाटे. मर्ढेकरांवर रामदासांचा प्रभाव होता असे वाटण्याचे कारण हेच जे पूर्वपरंपरेचा धागा शोधत राहणे हे होय. हेन्री डेव्हिड थोरोवर हिंदू तत्त्वज्ञानाचा प्रभाव पडला. त्याचा प्रभाव वर्डस्वर्थवरही पडला. या वर्डस्वर्थचा प्रभाव पुढे केशवसुतांवर पडला. हा एक प्रकारचा काव्यात्म संवादच होय. त्यामुळे मराठी कवितेची परंपरा अव्वल इंग्रजी कालखंडात खंडित झाली या सर्वसामान्यपणे प्रसृत झालेल्या समजाला आधार नाही हे स्पष्ट होते. हा साऱ्या विचारांची मांडणी गं. बं. च्या 'केशवसुतांची कविता : परंपरा व प्रयोग' या लेखात झाली आहे.

### आधुनिक मराठी समीक्षा व गं. ब. :

साहित्याचा सर्वंकषपणे विचार करण्याच्या पद्धतीचे दर्शन गं. बं.च्या भूमिकेत दिसते. गं. बं. च्या मते प्रत्येक भाषेचे जसे वेगळे भाषाशास्त्र नसते तसे वेगळे साहित्यशास्त्रही नसते.

त्यामुळे आपल्यापाशी संस्कृतप्रमाणे स्वत:चे मराठीचे वेगळे असे साहित्यशास्त्र नाही, याविषयीची खंत करणे अनाठायी होय. समीक्षेच्या अस्तित्वाचा लाभ लेखकाला जसा झाला पाहिजे तसा वाचकालाही झाला पाहिजे. हेच ते समीक्षेचे दुहेरी कार्य. संस्कृत साहित्यशास्त्र हे त्या त्या काळातील साहित्यनिर्मितीशी संबंधित होते. वाचकालाही त्याच्या कार्यकलापांत भाग घेण्यास वाव होता. आधी वाङ्मयाच्या निर्मितीचे स्वरूप ध्यानात घेतले पाहिजे आणि त्यातून सिद्धांताचे आकलन करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. प्योर थियरीचे स्वरूप सर्वसाधारण वाचकाच्या आकलनात येत नाही. मराठीतील समीक्षा ही तत्त्वज्ञानात्मक व सैद्धान्तिक बनू पाहते आहे. त्यामुळे लेखकाला व वाचकालाही ही समीक्षा जड वाटते. रा. भा. पाटणकर, प्रभाकर पाध्ये वगैरेंची सौंदर्यमीमांसा क्लिष्ट असे वाटण्याचे कारण हे. समीक्षा ही वाङमयकृतीची हवी, वाङ्मयकृतीवर आधारलेली हवी.

गं. ब. हे स्वागतशील समीक्षक होते. त्यांच्या मते रूढ कसोट्या बाजूला ठेवून नव्या वृत्ती-प्रवृत्तींचे, काही काळपर्यंत म्हणजे त्या स्थिर होईपर्यंत, नव्या वृत्ती-प्रवृत्तींचे झट्कन् मोकळ्या मनाने स्वागत केले पाहिजे. वेळच्या वेळी उत्तेजन दिले पाहिजे. वाङ्मयातही पिढ्यांतील दुरावा असतो. बदलत्या प्रवृत्तीचे प्रतिबिंब वाङ्मयात पडणे साहजिकपणे होत असते. इलियट-मर्ढेकर यांचा विशेष प्रभाव असलेले मराठीतील 'आर्द्रा'कार य. द. भावे हे एक महत्त्वाचे कवी होते. परंतु त्यांची कविता अपेक्षा पूर्ण करू शकली नाही याविषयीची खंत ते बोलून दाखवीत.

**वा. ल. व गं. ब. :**

वा. ल. कुलकर्णी व गं. ब. ग्रामोपाध्ये या दोघांतल्या अनेक वर्षांच्या अनुबंधामुळे जर एखाद्या अभ्यासकाला वा. लं. च्या समीक्षादृष्टीचा प्रभाव गं. बं.वर पडला असल्याचे वाटले तर नवल वाटायला नको अन् त्याविषयीची जाणीव गं. बं.नाही होती. परंतु ते असे वाटणे संपूर्णतया बरोबर आहे असे म्हणता येणा नाही असे ते म्हणत.

वा. ल. बद्दल गं. ब. म्हणत की ते वाङ्मयाच्या प्रकृतिप्रयोजकाबद्दलच नव्हे, तर त्याच्या विविध आविष्काराच्या संबंधाने सातत्याने लेखन करीत. आशयाभिव्यक्तीचे ऐक्य, वाङ्मयाची स्वायत्तता आणि कलामूल्यांच्यावर भर याबाबतची त्यांची मतेही निश्चित झाली होती. त्यामुळे ते प्रख्यात समीक्षक झाले होते. त्यांच्याशी झालेल्या चर्चांचा संस्कार स्वत:वर झाला असल्याचे गं. बं.ना मान्यच होते; परंतु गं. बं.ची प्रकृतिप्रयोजनासंबंधीची मते बेळगावातील वास्तव्यातच निश्चित झाली होती. ॲरिस्टॉटलच्या मतांचा प्रभाव होताच. त्यामुळे वाङ्मयाची स्वायत्तता, अभिव्यक्तीची एकात्मता, कलात्मक मूल्यांवर भर देण्याचा आग्रह ही वा. लं. च्या मतांशी जुळणारी मते असली तरी, वाङ्मयीन मूल्ये आणि जीवनमूल्ये भिन्न असली तरी कलामूल्ये जीवनाच्या अंतिम व शाश्वत मूल्यांशी एकरूप होतात, किंबहुना ती तशी झाली पाहिजेत असे गं. बं. ना वाटत असे. त्यांचे काही महत्वाचे लेख खालील-प्रमाणे आहेत :

१. ललित वाङ्मय आणि राजकीय प्रचार, २. काव्य, कथा आणि कादंबरी, ३. विनोद आणि काव्य, ४. जीवनमूल्ये आणि वाङ्मयीन मूल्ये, ५. आशयाभिव्यक्तीचे अद्वैत आणि नाटकात रूपांतर, ६. भारतीय वाङ्मयाचा तौलनिक अभ्यास.

त्यांच्या या लेखांची शीर्षके डोळ्यांखालून घातली तरी वा. लं. च्या लेखनशैलीशी साधर्म्य आहे असा समज होऊ शकतो. त्यांतील आशय खचितच वा. लं. च्या कलावादी भूमिकेशी समांतरपणे जातो; परंतु वा. लं. च्या सहवासात दीर्घ काळ राहून अन् स्वत:चे वाङ्मयविषयीचे वाचन, चिंतन व सूत्रबद्ध तसेच नियमित लेखन करण्याची क्षमता असूनही गं. बं. ना सातत्याने सैद्धान्तिक पाठपुरावा करणे जमले नाही, त्यांना आपले व्यक्तिमत्त्व सौम्य तसेच आपले लेखनही अल्प व विशेष दृष्टीत न येणारे आहे याविषयीची खंतही होती. असे जरी असले तरी त्यांच्या नावावर डोळ्यात भरावी इतकी ग्रंथसंपदा आहे, हेही नसे थोडके :

१. संतकाव्यसमालोचन (१९३९), २. पेशवे दप्तरातील मराठी भाषेचे स्वरूप (१९४१) ३. वाङ्मयमूल्ये आणि जीवनमूल्ये (१९५०) ४. भाषाविचार आणि मराठी भाषा (१९६४, १९७३, १९७९), ५, वाङ्मयविचार (१९६८), ६. मराठी आख्यानक कविता (१९७०), ७. निळावंती (कविता १९५४)

**संपादने, व्याख्यानमाला इत्यादी :**

१. मराठी बखर गद्य (संपादन, १९५२, १९६३)
२. एका पिढीचे आत्मकथन (सहकार्याने संपादन, १९७५)
३. इ. स. १६८० ते १८१८ या वाङ्मयीन कालखंडाचा अभ्यास (a period study, १९६८)
४. मराठी आख्यानक कविता (वामन मल्हार जोशी व्याख्यानमाला),
५. चक्रधर ते तुकाराम (बार्शी साहित्य सभा व्याख्यानमाला, फेब्रुवारी १९८०)

डॉ. गं. बं. ग्रामोपाध्ये यांच्या व्यक्तिमत्त्वातून जीवनविषयक व साहित्यविषयक प्रश्नाविषयीचा स्रोत वाहत होता हे या लेखातून स्पष्ट होईल अशी आशा आहे.

**डॉ. सु. म. तडकोडकर**
१/बी एस/५ दुसरा माळा, कामत प्लाझा/सांता इनेज, पणजी, तिसवाडा, गोवा ४०३००१

❑

---

## स्वागत

**मराठीचे वर्णनात्मक भाषा विज्ञान,** महेंद्र कदम, स्नेहवर्धन, १९०
**मराठी भाषा सौष्ठव- म्हणी-अलंकार-वाक्प्रचार,** डॉ. वसंत उत्पात, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, २२४

# "शब्दवती कविता"
## (स्त्रियांच्या कवितेवर एक दृष्टिक्षेप)

❑

डॉ. नीलिमा गुंडी

आपल्याकडे शंभर वर्षांहून अधिक काळची स्त्रियांच्या कवितेची खास परंपरा आहे. लक्ष्मीबाई टिळक, बहिणाबाई चौधरी, इंदिरा संत ते अलीकडील रजनी परुळेकर, नीरजा पर्यंतच्या या कवयित्रींच्या कविता एकीकडे स्वत:ची अशी ओळख देत असतानाच स्त्रीविशिष्ट संवेदनशीलतेची खास ओळखही देत राहतात., या कविता वाचताना स्त्रीच्या संवेदनशीलतेचे अनेक विशेष जाणवतात. शब्दांविषयीची संवेदनशीलता हाही त्यांपैकी एक विशेष होय. शब्दांवर विसंबून राहण्याची, शब्दांसाठी तहानलेले राहण्याची वृत्ती या कवितांमध्ये सतत आढळत राहते. ही कृती जाणून घेण्यासाठी आपल्याकडील स्त्रीचे सामाजिक जीवन आणि तिची कविता यांचा परस्परसंबंध नजरेखालून घालायला हवा.

स्त्रीपुरुषसमतेच्या आपल्याकडील आद्य पुरस्कर्त्या ताराबाई शिंदे यांचा 'स्त्रीपुरुषतुलना' (१८८२) हा दीर्घ निबंध प्रसिद्ध आहे. स्त्रियांच्या स्वभावाचे बारकावे सांगताना त्या त्यात लिहितात : "स्त्रिया निरंतर या संसारांत नाना प्रकाराचे कष्ट, हाल, तहानभूक, जाच, हाणमार सोसून, फक्त एक तुमच्या गोड शब्दाच्या भुकेल्या असतात."[१]

स्त्रीस्वभावाचे हे सहानभूतिपूर्ण शब्दासाठी आसुसलेले राहण्याचे लक्षण नीट समजून घ्यायला हवे. आपल्याकडे स्त्रीची प्रतिमा दोन टोकांमध्ये रंगवलेली दिसते. स्त्री ही बोलकी, 'तोंडात तीळ भिजत नाही' अशी, प्रसंगी तर बोलभांडही!- हे तिचे एक रूप असते. तिच्या बडबड्या स्वभावामुळे तिला कोणी कसले 'गुपित' सांगितले की ती ते न राहवून , कधी झाडाशी, तर कधी भग्न वाड्यातल्या भिंतीशी बोलून मोकळी होणार!- असे तिचे चित्र लोककथांमध्येही पाहायला मिळते. तिच्या अशा उपजत वृत्तिप्रवृत्तींना प्रत्यक्ष समाजजीवनात मात्र कळतनकळत अनेक दडपणांना सामोरे जावे लागते. तिच्या अभिव्यक्तीवर अनेक संकेतांमुळे बंधने येत जातात. आपल्याकडील कुटुंबपद्धती, स्त्री आणि पुरुष यांच्या मर्यादशीलतेच्या कल्पना, त्यातून येणारा संकोच, बुजरेपणा इत्यादी कारणांमुळे स्त्रीची ही शब्दांची भूक पूर्ण होत नसावी. स्त्रियांच्या कवितेत त्यांचे हे शब्दांसाठी जीव पाखडणे, निग्रहाने मौन राखणे वाचायला मिळते. त्याची काही वेचक उदाहरणे पाहू:

१. *'माझं दु:खं, माझं दुखं, तयघरात कोंडलं-*[२] बहिणाबाई
२. *'गिळले जे दु:ख मुक्याने*
*ते वीष होउनी भिनले'*[३] अरुणा ढेरे
३. *किती काळ गोठणार*
*ओठीं मुकें संभाषण?'*[४] पद्मा लोकूर
४. *'माझी वाणी मुकी झाली तेव्हा-'*[५] अनुराधा पोतदार
५. *'कधी कधी न अक्षरांत*
*मन माझे ओवणार'*[६] इंदिरा संत
६. *'मनातले सारे उत्कट भाव पुरासारखे*
*थांबतात मौनाच्या उंबरठ्याशी येऊन'*[७] शांता शेळके
७. *'तुझ्या उदार हातांनी*
*नाकारलेला आधार अन्*
*माझे मिटलेले ओठ*
*एवढेच खरे आहे'*[८] अनुराधा पाटील.

अशा अनेक ठिकाणी कवयित्रींचे मौन भरभरून बोलते. त्यांच्या कोंडमाऱ्याला वाचा फुटते. हे मौन 'लाडिक रुसवा' या प्रकारात मोडणारे नक्कीच नाही! (काही कवयित्री त्या लाडिक मौनातच रमतात, ती गोष्ट वेगळी!) हे मौन म्हणजे स्त्रीसाठी मूक सोशिकपणाचे व्रत असते. त्यांनी ते व्रत आचरणात आणावे, अशी समाजाची अपेक्षा असते.

अशा वेळी कविता ही कवयित्रींसाठी आत्मप्रगटीकरणाचे समर्थ माध्यम ठरते. त्यांचे आंतरिक भावविश्व तेथे उसळी मारून वर येते. आत्माविष्काराची निकड उत्कटपणे व्यक्त करणारी सुनीता जोशी यांची एक कविता येथे आठवते. त्या लिहितात:

*''खोलवर रक्तवाहिन्या रोखून*
*एका अश्रूची वाट मोकळी करणारी*
*एकाकी कविता भेटते अजून''*[९]

अरुणा ढेरे यांची 'करुणाष्टक', आसावरी काकडे यांची 'शब्दघट' या कविताही याच उत्कटतेचा प्रत्यय देणाऱ्या आहेत.

कवयित्रींची आणखी एक गरज कविता पूर्ण करते. ती गरज म्हणजे दुसऱ्याशी संवाद करण्याची गरज. आपले सुखदु:ख प्रेमाने ऐकून घेणारे असे कुणी दरवेळी भेटतेच असे नाही. पुरुषप्रधान संस्कृतीमुळे स्त्रीपुरुष नात्यात मैत्रीचा अभाव राहतो. त्यामुळे सहजीवनातही परस्परसंवाद साधला जातोच, असे नाही. अशा वेळी कविता ही एक 'सखी' या नात्याने जवळ येते. स्त्रीच्या अव्यक्तीला मुक्त अवकाश प्राप्त करून देते. आपल्याकडे लोकगीतांपासून 'सईबाई', 'शेजीबाई' अशा नात्यांनी स्त्रिया एकमेकींशी मने मोकळी करताना दिसतात. या परंपरेत आधुनिक काळात 'कवितासखी'ला स्थान मिळते. शान्ता शेळके यांनी आपल्या

'किनारे मनाचे' या संग्रहाच्या अर्पणपत्रिकेत लिहिले आहे :

"कविता- या सुंदर आणि चैतन्यमय सखीला स्नेहपूर्वक अर्पण. तिने मला सतत सहवास, आनंद आणि सांत्वन दिले."

कवितेला उद्देशून कविता अनेकजणींनी लिहिल्या आहेत. 'कविते'ला उद्देशून लिहिलेल्या एका कवितेत नीरजा लिहिते–

*"साऱ्या अंगावर हुंदका फुटावा*
*असे चार शब्द*
*बोलून गेली असतीस*
*तर आज मी अशी*
*असह्य*
*तळ हरवलेल्या पारदर्शक पाण्यात*
*तुला हुडकत बसले नसते."*[१०]

'कविता'नामक सखीशी बोलता बोलता सुरू होणारा कवयित्रींचा 'आत्मसंवाद' महत्त्वाचा असतो. मानसशास्त्रात Self-talk ला –आत्मसंवादाला– महत्त्व असते. कवयित्रींचा आत्मसंवाद त्यांच्या अंतर्मनात डोकावण्याची संधी देतो. आत्मसंवादाच्या बळावर त्या जणू स्वत:साठी एक स्वतंत्र वाट शोधत असतात. रजनी परुळेकर एके ठिकाणी लिहितात:

*"मी प्रकट बोलत असले*
*तरी तुला म्हणून काही*
*सांगतच नसते अनेकदा*
*वर्तमानाचा जबडा आणि भविष्यकाळाची गुहा*
*यांच्यातून वाट काढण्यासाठी*
*स्वत:लाच धीर देत असते."*[११]

कवयित्री एखाद्या भासविश्वासारखे स्वतंत्र विश्व जणू शब्दांनी निर्माण करतात. शान्ताबाईंनी एके ठिकाणी 'शब्दांच्याच दशदिशा' असा शब्दप्रयोग केला आहे. तो अगदी सार्थ आहे! हे विश्व केवळ शब्दांमधून निर्माण होते असे नव्हे, तर ते शब्दांचेच विश्व असते. शान्ताबाईंनी अनेक ठिकाणी शब्दांशी असलेले ऋणानुबंध गहिरेपणाने व्यक्त केले आहेत. त्या म्हणतात-

*"माझ्या असण्याची मला शब्द देती ग्वाही*
*शब्दांहून वेगळी मी नाही, नाही, नाही."*[१२]

खरेतर *"त्वचेखालील एकाकीपण कधी सरते काय?"*[१३]

असा प्रश्न उपस्थित करणाऱ्या शांताबाईंना शब्दांचा वाटणारा भावनिक आधार फार मोठा आहे. आपले एकटेपण झाकून टाकण्यासाठी अंतर्बाह्य शब्द पांघरून घेण्याची जणू ही धडपड आहे.

शांताबाईंच्या 'ग्वाही', 'हे शब्द', 'तसे तर शब्द' अशा अनेक कविता शब्दांविषयीची भावना बोलून दाखवतात. 'शब्द माझा आरसा' अशी ती भावना आहे. ही जिवलगपणाची, नितळ, मोकळी भावना व्यक्त करताना त्या लिहितात:

*''अजूनही जेव्हा मन भरून येते अनिवार*
*करावे वाटते स्वतःला शब्दांपाशीच मोकळे*
*वाटते, त्यांनाच जावे सर्वस्वाने शरण*
*तेच जाणून घेतील आतले उत्कट उमाळे''*[१४]

शब्दांविषयी अतीव संवेदनशील असल्यामुळे कवयित्रींना प्रचलित भाषेविषयीही तीव्र असमाधान व्यक्त करावेसे वाटते. शब्दांचे निरागसपण, चैतन्य जपण्याची धडपड त्यांच्या कवितेत दिसते. प्रभा गणोरकर यांनी आपल्या काही कवितांमध्ये ही जाणीव व्यक्त केली आहे. नवी भाषा, नवी लिपी हवीशी वाटते, असे बोलून दाखवले आहे. ठरावीक वळणांनी चालणारे भाषेचे चलनवलन अपरिहार्यपणे बोथट होत जाते. त्याची खंत व्यक्त करतानाच गणोरकर स्वत:पुरती, तरलपणा जपणारी भाषा आपलीशी करतात. ती अशी:

*''म्हणून मी ऐकते पानांची थरथर.*
*वाऱ्याची सळसळ.*
*अष्टदळी लिलीच्या उमलण्याचा आवाज''*[१५]

स्त्रीमनाची सर्जनशीलता अशी भाषेच्या वाटेने आणि भाषेशी निगडित प्रतिमांमधून व्यक्त होत राहते. प्रज्ञा लोखंडे आपल्या एका कवितेत आईविषयी लिहितात. 'उत्कट जीवघेण्या धगीवर' मध्ये त्या आईशी संवाद साधताना लिहितात-

*'यातनेच्या त्रेपन्नाव्या अक्षराला नवा जन्म देतेस!''*[१६]

येथे स्त्रीच्या जगण्यातील सर्जनशीलता आणि भाषेतील सर्जनशीलता यांची नाळ जोडली जाते. स्त्रीच्या जगण्याचा पैस भाषेच्या सांकेतिक अवकाशात मावणार नाही, हे सुचविलेही जाते.

स्त्रियांच्या कवितेत शब्द हे कवितेचे केवळ माध्यम म्हणून उरत नाहीत. ते त्यांच्या अस्तित्वाची खूण असतात. काही वेळा शब्दांच्या ओंजळीत परमविश्वासाने त्यांनी स्वत:ला पूर्णपणे झोकून दिलेले असते. अशा वेळी त्यांच्या कवितेतल्या शब्दांचे रसिकांनी कौतुक केल्यावर त्यांना काय वाटावे? अनुराधा पोतदार यांनी एका कवितेत हा अनुभव व्यक्त केला आहे. 'या शब्दांचं तीव्र रसायन' मध्ये त्या, आपली जीवघेणी वेदना व्यक्त करणाऱ्या शब्दांचे कौतुक ऐकून लिहितात: ''वाऱ्यावरून तुमचे उद्गार माझ्या कानांवर येतात तेव्हा मृत्यूच्या प्रवाहात अलगद धारेला लागलेल्या ऑफिलियाकडे पाहून म्हणावे,

*''वा! काय सुंदर मरते आहे!''*
*तसे एक धारदार पाते लक्कन चाटून जाते.''*[१७]



अनुक्रमणिका







शब्दांशी असे खासगी नाते असल्यामुळे शब्दांतून व्यक्त झालेल्या भावनेच्या अभिव्यक्तीविषयी चांगले-वाईट असे काहीच भाष्य करणे एकप्रकारे अप्रस्तुत ठरावे, अशी स्थिती येते!

स्त्रियांची कविता ही अशी 'शब्दवती' आहे. स्त्रियांच्या काव्यदृष्टीचे ते एक वैशिष्ट्य आहे. त्यांचे जगण्यावरचे भाष्यही त्यातून सुचविले गेले आहे. त्यांची कविता वाचताना हे लक्षात ठेवावे लागते. शब्दांशी आंतरिक नाते असल्यामुळे स्त्रियांची कविता अनेकदा भावपूर्ण होते खरी! पण त्यापलीकडे तिची झेप क्वचितच जाते. शब्दांमधील कलात्मक सामर्थ्याचा पूर्णपणे लाभ त्यांना करून घेता येत नाही. ही शब्दवती कविता समीक्षकांच्या लेखी आत्मकेंद्री, हळवी, क्वचित शब्दबंबाळही ठरते. शब्द हे 'जगण्याचे सारसर्वस्व' म्हणून पाहिल्यामुळे शब्दांकडे 'एक कलात्मक माध्यम' म्हणून पाहण्यासाठी आवश्यक ती अलिप्तता त्यांच्याकडे पुरेशा प्रमाणात येत नाही. त्यामुळे त्या कवितेत प्रयोगशीलतेलाही फारसा वाव मिळत नाही.

मात्र गेल्या काही वर्षांमध्ये कवयित्रींच्या कवितेत बदलाच्या प्रसादखुणा दिसत आहेत. शब्दांद्वारे स्त्रीच्या शोषणाला केवळ वाचा फोडून न थांबता काही कवयित्री शब्दांकडे 'एक शस्त्र' या नात्याने पाहू लागल्या आहेत. ('मी परजायची तलवार, माझ्या शब्दांची'[१८] - नीरजा) सामाजिक परिस्थितीचा रेटा त्यांना नवी दृष्टी द्यायला मदत करीत आहे. मल्लिका अमरशेखरचा 'महानगर' (१९९९), सुहासिनी इर्लेकर यांचा 'गाथा' (१९९७) हे काव्यसंग्रह वाचताना जाणवते की स्त्रियांनाही काव्यात उपरोधाचा वापर मार्मिकपणे करता येत आहे. रजनी परुळेकर यांच्या दीर्घकवितांमध्ये आत्मलक्ष्यी राहूनही इतरांच्या व्यथावेदना समर्थपणे व्यक्त करण्याइतका शब्द लवचिक, प्रसरणशील होताना दिसत आहे.

भावनेच्या लाटेसरशी शब्दांत वाहत जाण्याऐवजी शब्दांवर हुकमत मिळवण्याचे आव्हान आजच्या कवयित्रींसमोर आहे. समग्र जीवनार्थाचा आशय कवेत घेणाऱ्या शब्दाची प्रतीक्षा त्यासाठी त्यांना करावी लागणार आहे. हे त्यांना कितपत साध्य होईल? अंजली कुलकर्णी एका कवितेत लिहितात-

> ***''माझा टाहो***
> ***आज अवकाशाचे टवके काढतो आहे***
> ***पण मला खात्री आहे***
> ***आज ना उद्या***
> ***या अभंग भिंतीला भेदून***
> ***माझे गाणे***
> ***स्वतंत्र आकाशात झेपावणार आहे.''***[१९]

इतका कणखर आत्मविश्वास जर आज कवयित्रींजवळ असेल, तर भविष्याविषयी आशावादी राहायला हरकत नाही.

## संदर्भ-सूची

१. ताराबाई शिंदे, 'स्त्रीपुरुषतुलना', संपा. विलास खोले, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृ. १०२
२. बहिणाबाई चौधरी, 'बहिणाईची गाणी', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, द्वि. आ. १९७८, पृ. १०८
३. अरुणा ढेरे, 'यक्षरात्र', सुरेश एजन्सी, पुणे, १९८७, पृ. ३५
४. पद्मा लोकूर, 'मनोरा', मौज प्रकाशन, मुंबई, १९६७, पृ. ३४
५. अनुराधा पोतदार, 'कॅक्टसफ्लॉवर', मौज प्रकाशन, मुंबई, १९७९, पृ. ७
६. इंदिरा संत, 'मेंदी', मौज प्रकाशन, मुंबई, द्वि. आ., १९६७, पृ. १३
७. शान्ता शेळके, 'किनारे मनाचे', संपा. प्रभा गणोरकर, मेहता प्रकाशन, पुणे १९९९, पृ. १६२
८. अनुराधा पाटील, 'दिगंत', कुशा प्रकाशन, औरंगाबाद, १९८१, पृ. २१
९. सुनीता जोशी, 'आत्मरंग,' प्रका. ना. श्री. कुलकर्णी, मुंबई, १९९२, पृ. ३०
१०. नीरजा, 'वेणा', नीलकंठ प्रकाशन, पुणे, १९९४, पृ. १६६
११. रजनी परुळेकर, 'स्वीकार', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९३, पृ. ४२
१२. शांता शेळके, 'जन्मजान्हवी', सुरेश एजन्सी, पुणे, १९९०, पृ. ९५
१३. शांता शेळके, 'गोंदण', मेहता प्रकाशन, पुणे, आ. ४, १९९९, पृ. ४२
१४. शांता शेळके, 'किनारे मनाचे' उनि, पृ. १७१
१५. प्रभा गणोरकर, 'विवर्त', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८५, पृ. ४४
१६. प्रज्ञा लोखंडे, 'मौज', दिवाळी अंक १९९९, पृ. ४५
१७. अनुराधा पोतदार, 'कॅक्टसफ्लॉवर', उनि, पृ. २१
१८. नीरजा, 'वेणा', उनि. पृ. १६३
१९. अंजली कुलकर्णी, 'मी: एक स्त्रीजातीय अस्वस्थ आत्मा', मानसन्मान प्रकाशन, पुणे, १९९५, पृ. २७.

**–डॉ. नीलिमा गुंडी**
३, अन्नपूर्णा,१२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे २



---

## स्वागत

**भक्तिमार्ग प्रदीप अर्थात श्री उपेन्द्र मोहन लीलामृत,** प्र. ना. अवसरीकर, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, ३९२

**भारतीय साहित्यविचार,** लीला गोविलकर, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, २७२

# मराठी कोशकर्ते 'मोरेश्वरशास्त्री'
## जेम्स टी. मोल्सवर्थ



**श्री. संभाजी भोसले**

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात महाराष्ट्रात शिक्षणपद्धतीत आमूलाग्र बदल घडून आले. मराठी भाषेच्या विकासाचे प्रयत्न सुरू झाले. याच काळात शालेय पुस्तके, शिक्षणसंस्था उदयास आल्या, भाषेच्या सखोल शास्त्रशुद्ध अभ्यासाची गरज निर्माण झाली. परकीय सत्तेच्या काळात मराठी व्याकरण, भाषा याविषयी निरनिराळ्या साहित्याची निर्मिती होऊ लागली. प्राचीन वाङ्मयात मराठी भाषेतून अनेक ग्रंथ व साहित्य निर्माण झाले. मराठी ही स्वभाषा असल्यामुळे त्या काळात भाषेच्या व्याकरणाची व शब्दकोशाची आवश्यकता नव्हती. राज्यकर्त्यांना प्रजेची भाषा अवगत होणे महत्त्वाचे असते याच विचाराने परकीयांनी धर्मप्रसार व राज्यकारभार या दृष्टीने मराठी भाषा शिकण्याचे धोरण स्वीकारले. इंग्रज अधिकाऱ्यांना भारतात नेमणूक होताना स्थानिक भाषा व हिंदुस्थानी भाषा याच्या परीक्षा अनिवार्य होत्या. या अधिकाऱ्यांना भाषेचे यथार्थ ज्ञान व्हावे म्हणून शब्दकोशाची निर्मिती झाली.

१८१० मध्ये मराठीतील पहिला कोश बंगालमध्ये श्रीरामपूर येथील ख्रिस्ती मिशनरी मंडळाकरिता डॉ. विल्मय केरी (William Carey) यांनी कलकत्यातील फोर्ट विल्यम कॉलेजमधील मराठीचा प्रमुख पंडित वैजनाथ शर्माच्या सहाय्याने छापला. हा कोश मराठी शब्द मोडी ठशांच्या स्वरूपात होता. याची पृष्ठसंख्या ६५२ होती, दुसरा मराठी कोश १८२४ मध्ये ले. क. व्हॉन्स केनेडी (Vans Kennedy) या लष्करी अधिकाऱ्याने प्रसिद्ध केला. या कोशाचे दोन भाग होते. पहिल्या भागात मराठी शब्दांना इंग्रजी प्रतिशब्द दिलेले आहेत व दुसऱ्या भागात इंग्रजी शब्दांना मराठी प्रतिशब्द दिलेले आहेत. या कोशाची शब्दसंख्या आठ हजार होती. प्राचीन मराठीत कोशवाङ्मयाची संकल्पना नव्हतीच म्हटले तरी चालेल. 'विवेकसिंधू' व 'ज्ञानदेवी' यांसारख्या ग्रंथात व महानुभाव पंडित भीष्माचार्य यांच्या 'नामविभक्ती' व 'पंचवार्तिक' यांसारख्या ग्रंथात टीपेच्या स्वरूपात शब्दांचे अर्थ दिलेले आढळतात, परंतु हे भाषाकोश नव्हते. एकोणिसाव्या शतकात खऱ्या अर्थाने कोशवाङ्मयाचा पाया जेम्स. टी. मोल्सवर्थ या इंग्रज लष्करी अधिकाऱ्याने घातला. मोल्सवर्थ यांचा मराठी-इंग्रजी शब्दकोश हा मराठी भाषेच्या इतिहासातील एक चमत्कारच म्हणावा

लागेल. या अर्वाचीन कोशाच्या रचनेत त्यांनी अनेक एतद्देशीय पंडितांचे साहाय्य घेतले. सामूहिक ग्रंथनिर्मितीचा हा त्या शतकातील यशस्वी प्रयोग होता. या कोशाची कल्पना, परिश्रम व संपादनाचे श्रेय मोल्सवर्थ व त्यांचे सहाय्यक मेजर कँडी यांच्याकडेच जाते.

जेम्स टी. मोल्सवर्थ यांचा जन्म इंग्लंडमध्ये १७९५ मध्ये झाला. ईस्ट इंडिया कंपनीच्या लष्करी सेवेत ते १८१२ मध्ये कॅडेट म्हणून भरती होऊन भारतात आले. तत्कालीन नियमानुसार त्यांनी मराठी व हिंदुस्थानी भाषांची परीक्षा दिली व नवव्या नेटिव्ह इन्फट्रीच्या दुसऱ्या बटालियनमध्ये भाषाभिज्ञ (Linguist) म्हणून त्यांची नेमणूक झाली.

१८१६ मध्ये ते लेफ्टनंट झाले व १८२४ मध्ये त्यांना कॅप्टन हुद्द्यावर बढती मिळाली. सोलापूर येथे त्यांची नेमणूक झाली असताना त्यांनी मेजर कॅन्डी यांच्या मदतीने पुष्कळ मराठी शब्द गोळा केले. १८२४ मध्ये त्यांची बदली मुंबईस झाल्यावर त्यांनी मुंबईचे तत्कालीन गव्हर्नर एलफिन्स्टन यांच्याकडे मराठी-इंग्रजी व इंग्रजी-मराठी कोश तयार करण्याची इच्छा व्यक्त केली. एलफिन्स्टनच्या प्रेरणेने मुंबईत त्याच वेळी 'मुंबईची हैदशाळा' व शाळापुस्तक मंडळी, जन्माला आली होती. या संस्थेचे मराठी भाषेतून कोशव्याकरणादी ग्रंथ निर्माण व्हावेत म्हणून प्रयत्न चालू होते. गुजरातमध्ये खेडा येथे मोल्सवर्थ यांची नेमणूक झाली असताना त्यांनी कोशलेखनास सुरुवात केली. एलफिन्स्टनला कोशकार्याचे महत्त्व पटले होते. १८२६ मध्ये मोल्सवर्थ यांच्या विनंतीवरून सरकारने टॉमस व जॉर्ज कॅण्डी या बंधूंची मोल्सवर्थ यांचे मदतनीस म्हणून नेमणूक केली. १८३१ मध्ये मोल्सवर्थ यांचा कोश पूर्ण झाला.

मोल्सवर्थ यांचा कोश धार्मिक हेतूने प्रेरित होऊन लिहिला होता. कोशाच्या प्रस्तावनेत ते लिहितात : 'हा कोश म्हणजे माझ्या सहा वर्षांच्या अथक परिश्रमाचे फळ आहे, मानसन्मान किंवा धनप्राप्तीच्या आशेने हे काम मी केले नव्हते. देदीप्यमान सत्याच्या प्रसारासाठी दुर्दम्य इच्छाशक्तीच्या जोरावर प्रकृती अस्वास्थ्य, अडचणी, त्रास सोसून मी हे कार्य पूर्ण केलेले आहे.' धर्मप्रसाराच्या हेतूने रचलेला हा कोश मुंबईचे तत्कालीन गव्हर्नर एल्फिन्स्टन व माल्कम यांना अर्पण केलेला आहे. अर्पणपत्रिकेत या प्रदेशातील बोलीभाषेचा सर्वांना सुलभतेने लाभ घेता यावा या इच्छेने 'अर्पण' असे नमूद केलेले आहे. ह्या कोशाचे स्वरूप पुढे धार्मिक प्रसार न राहता सर्व दृष्टीने उपयोगी असे दिसून आले. या कोशासंदर्भात मोल्सवर्थ यांनी केलेला पत्रव्यवहार सरकारी दप्तरखान्यात पाहायला सापडतो त्यावरून त्यांच्या धडपडीची व श्रमाची कल्पना येते. २१ जानेवारी १८२४ मध्ये सरकारकडे त्यांनी प्रथम विनंती अर्ज करून कोश तयार करणार असल्याचे कळविले, परंतु सरकारने नुकताच केनेडीचा कोश प्रसिद्ध केला असल्याने कोशकर्त्याने स्वत: कोश छापावा त्याकरता तीन हजार रुपये मिळतील असे सरकारकडून ७ फेब्रुवारी १८२४ मध्ये मोल्सवर्थ यांना कळविण्यात आले (GD Vol./ 15/73 1824, p. p. 45-46). परंतु नंतर सरकारने मोल्सवर्थ यांना या कोशाच्या खर्चापोटी दहा हजार व पाच हजाराचे बक्षीस दिले (GD Vol./ 237, 1831 p. 86). ह्या कोशाच्या कामी सरकारकडून आवश्यक त्या सवलती देण्यात आल्या होत्या. मोल्सवर्थ

यांनी या कोशाचे लेखन डॉ. जॉन्सन यांच्या इंग्रजी कोशाच्या धर्तीवर केले. त्यांनी अविश्रांत श्रम घेऊन कोशाकरिता संदर्भ म्हणून डॉ. विल्सनचा संस्कृत कोश, केनेडींचा मराठी-इंग्रजी कोश, एल रीड या सरकारी अधिकाऱ्याने तयार केलेली कोकणी शब्दांची यादी, मे. साईक्स व रे. स्टिव्हनसन यांनी तयार केलेली वनस्पतीविषयक शब्दांची यादी यांचा संदर्भ म्हणून उपयोग केला. याखेरीज हचिनसन या लष्करी अधिकाऱ्याने गोळा केलेल्या तीस हजार मराठी शब्दांची यादी कोर्ट ऑफ डायरेक्टर्सच्याकडे पडून होती ती यादी मोल्सवर्थ यांनी ५ जुलै १८२८ रोजी कोर्ट ऑफ डायरेक्टर्सना विनंती करून मिळवली. परंतु ही यादी हाती येण्याअगोदर कोशाच्या आवृत्तीचा बराचसा भाग छापूनही झाला होता, या कोशाला पुरवणी जोडण्याचा मोल्सवर्थ यांचा विचार होता. त्याकरिता त्यांनी लोकांना सूचना, नवीन शब्द, सुधारणा या संदर्भात आवाहन केले होते. या बाबतीतील शाळापुस्तक-मंडळींना पाठवलेल्या पत्रांना सरकारने टपालहशिल माफ केल्याचे आढळते, परंतु ही पुरवणी काढल्याचे आढळत नाही.

हा कोश पूर्ण होण्यास सहा वर्षे लागली. या कोशास सरकारचे साह्य असल्यामुळे सरकारी आदेशानुसार खेडोपाड्यातून मराठी शब्द जमविण्यात आले. त्यांची संख्या सुमारे चाळीस हजारपर्यंत आहे. मराठीत रूढ असलेल्या फारसी, अरबी व हिंदुस्थानी शब्दांचा मोठ्या प्रमाणात संग्रह या कोशात आहे. यात फारशी शब्द फारशी लिपीत छापलेले आहेत. फारशी शब्दांचे वेगळेच अर्थ मराठीत रूढ झाल्याबद्दल संपादकांनी कोशात नापसंती नोंदवल्याचे आढळते, शब्दाबरोबर त्याची व्याकरणातील जात देऊन त्यांच्या लिंगाचा उल्लेख करण्यात आला आहे. शब्दांची व्युत्पत्ती शक्य तेथे देण्याचा प्रयत्नही करण्यात आला आहे. महत्त्वाचा व रूढ अर्थ प्रथम देऊन इतर अर्थ नंतर देण्यात आलेले आहेत. कोणत्या भाषेतून तो शब्द आला, ते दाखवताना महाराष्ट्राच्या कोणत्या विभागात तो विशेष रूढ आहे ते सांकेतिक चिन्हाने दर्शविले आहे. या कोशात देवधर्मविषयक शब्द, याच सुमारास प्रसिद्ध झालेल्या पंडित मंडळाच्या महाराष्ट्र भाषेच्या कोशात स्थान न मिळालेले सुमारे तीन हजार अरबी व फारशी शब्द आणि ज्या संस्कृत शब्दांचे इंग्रजीत भाषांतर होऊ शकेल असे संस्कृत शब्द आहेत. अशिष्ट शब्दांचाही या कोशात समावेश आहे. त्याबाबत कोशकर्त्यांनी असा खुलासा केला आहे की, खालच्या वर्गाच्या लोकांच्या बोलण्यामध्ये अशिष्ट शब्द वारंवार येतात व ते अशिष्ट असल्याचे त्यांना वाटत नाही, स्त्रियांच्या व सुशिक्षितांच्या तोंडीही हे शब्द असल्यामुळे ते कोशातून वगळणे शक्य नव्हते. एकाच शब्दाचे वेगवेगळ्या संदर्भात अनेक अर्थ होतात त्याचा अत्यंत बारकाईने कोशकर्त्यांनी अभ्यास केलेला आढळतो. उदाहरणार्थ 'घर' या शब्दाचे त्रेचाळीस (पृष्ठ ३००-३०१), 'तोंड' या शब्दाचे छपन्न (पृष्ठ ४७६-४७७), 'लागणे' या क्रियापदाचे चव्वेचाळीस (पृ. ९०२-९०३) असे वेगवेगळे अर्थ दिलेले आहेत. कॅरे, केनेडी व मोल्सवर्थ यांच्या कोशांची तुलना करताना असे आढळते की कॅरेने आठ हजार, केनेडीने सुमारे सोळा हजार व मोल्सवर्थने सुमारे चाळीस हजार शब्द आपल्या कोशात घातले आहेत. परंतु या सर्व कोशातील शब्दांची तुलना करता मोल्सवर्थचा कोश सर्वदृष्ट्या परिपूर्ण वाटतो. उदाहरणार्थ 'एरवी' या शब्दाचे मोल्सवर्थने चार अर्थ दिले आहेत.

केनेडीने एकच अर्थ दिला आहे. कॅरेच्या कोशात तर हा शब्दच नाही. मोल्सवर्थने बऱ्याच पंडितांच्या मदतीने हा कोश सहा वर्षं खपून बनवला म्हणून तो इतका परिपूर्ण होऊ शकला. आधुनिक काळातही कोशविषयक अपेक्षा पूर्ण करणारा असा हा कोश आहे.

हा कोश संपादन करताना कामाच्या पद्धतीविषयी संपादकांनी आपल्या निवेदनात म्हटले आहे की, ''मराठी प्रदेशातील वेगवेगळ्या विभागातून शब्द, वाक्यप्रचार आणि म्हणी जमा करण्याकरिता आम्ही काही ब्राह्मणांची योजना केली. त्यांना मिळालेल्या शब्दांमधून द्विरुक्तिस्वरूप किंवा अपभ्रंशस्वरूप किंवा इतर काही कारणांमुळे घेण्यास अयोग्य असे शब्द गाळून जवळजवळ पंचवीस हजार शब्द उपलब्ध झाले. यातील काही शब्द घेऊन आम्हा तिघांपैकी एकजण दररोज इतर सहा-सात-आठ ब्राह्मणांबरोबर चर्चा करी, प्रत्येक शब्दांची व्याकरणातील जाती, व्युत्पत्ती, लिंग, प्राथमिक आणि लाक्षणिक अर्थ, त्यांचा प्रचार, त्यांचे अक्षरलेखन याविषयी चर्चा होई. काही अर्थांकरिता उदाहरण, वाक्ये तयार करण्यात येत. ज्यांची अधिक चर्चा व्हावी असे वाटे, त्यांच्यावर तशा अर्थाची खूण करीत आणि त्याबाबत बहुतेक सारा विचार झाला असे वाटेपर्यंत त्यांचा विचार होई. निर्णित झालेल्या गोष्टी लगेच मराठी व इंग्रजी या भाषांमध्ये नोंदून ठेवण्यात येत. या शब्दांची नोंद अक्षरविल्ह्याने झाली की तद्विषयक सर्व कागद निराळे ठेवण्यात येत. हा एक विभाग झाला. दुसऱ्या विभागात एका निवांत खोलीत आमच्यापैकी दुसरा कोणी एका ब्राह्मणास घेऊन पत्रे, पुस्तके आणि कागद यांच्यामधून उपयुक्त शब्द, त्यांचा नवीन अर्थ, त्यांची नव्या तऱ्हेची योजना यांचा निर्णय करण्यास अधिकृत असे आधार शोधण्याचे काम करीत असे. त्या इमारतीमधील अधिक एकान्तामधील खोलीत आम्हा तिघांपैकी तिसऱ्या आणखी एका विशेष विद्वान ब्राह्मणास घेऊन जमलेल्या माहितीचे बलाबल पाहून, संक्षेप करून सारे लिहून काढी. हे तिसऱ्या विभागातील काम सर्वाधिक महत्त्वाचे आणि परिश्रमाचे असे. इकडे पहिल्या विभागातील अधिकारी पुढील अक्षर आणि तद्विषयक कार्यास प्रारंभ करी, शब्द जमा करणारे मधूनमधून शब्द घेऊन येत. त्यांच्या नवीन शब्दांची पुन: पाहणी व चर्चा होई, झालेल्या कामात चुका दिसून येत. अधिक नेटके प्रतिशब्द किंवा अर्थ सुचत, अधिक चांगली उदाहरणे तयार होत. अधिक निर्विवाद असे आधार सापडत. हे होत आहे तो बिनचूकपणा आणि निर्दोषता या कामामध्ये साधे या पद्धतीने आमचे काम झाले आणि मूळ पंचवीसहजार शब्दांची संख्या चाळीस हजारपर्यंत गेली.'' ह्या निवेदनावरून असे दिसते की कोशरचनेचे काम किती काटेकोरपणे अनेकांच्या सहकार्याने पद्धतशीर करण्यात आले.

मोल्सवर्थच्या मराठी–इंग्रजी कोशाच्या प्रथमावृत्तीच्या एक हजार सोळा प्रती प्रकाशित झाल्या. एका प्रतीची किंमत नव्वद रुपये होती (GD vol.237,1831.p80). परंतु ही किंमत सर्वसाधारण वाचकांना परवडणारी नव्हती त्यामुळे कोशाचा खप होत नव्हता म्हणून किंमत पासष्ट, पन्नास, वीस अशी उतरत गेली. किमतीत सवलत देऊनही पुष्कळ प्रतींना वाळवी लागली. या वाळवीने खराब झालेल्या प्रती दर प्रतीस दहा रुपये या दराने विकत घेण्याची

तयारी हुसेनखान महंमद या व्यापाऱ्याने दर्शवली, परंतु सरकारने ही विनंती अमान्य केली (GD vol.237,1831.p80). या कोशाची तपासणी सरकारने केनेडी, पोप, व मनी या त्रिसदस्यीस समितीकडे सोपवली. केनेडी व पोप यांनी या कोशाबाबत प्रतिकूल अभिप्राय दिला, मात्र रॉबर्ट मनी यांनी कोशाची वाखाणणी केली. Oriental Cristian spectator या ख्रिस्ती मासिकानेही कोशासंदर्भात गौरवोद्गार काढले.

अनेकांच्या प्रशंसेस पात्र ठरलेल्या या कोशाची सुधारित आवृत्ती तयार करण्यासाठी सरकारतर्फे मोल्सवर्थ यांना मुद्दाम इंग्लंडहून बोलावण्यात आले. १८५१ ते १८५७ या काळात काही पंडितांच्या मदतीने सुधारित कोशाच्या आवृत्तीचे काम पूर्ण केले. या कोशातील शब्दसंख्या साठ हजारापर्यंत आहे. याची पृष्ठसंख्या ९२० आहे. प्रत्येक पृष्ठ १२" × ९.५" या आकाराचे असून प्रत्येक पृष्ठावर तीन-तीन स्तंभांमधून शब्दांची मांडणी केलेली आहे. यावरून कोशाच्या आकाराची कल्पना येते. या कोशाच्या कामाबद्दल मोल्सवर्थ व त्यांच्या सहकाऱ्यांना पंचेचाळीस हजार रुपये सरकारकडून मानधन मिळाले (DPL Book Depot Vol. 22 1859 P. 130). या कोशाच्या संपादनाचे काम महाबळेश्वर येथे झाले.

मोल्सवर्थ यांच्या कार्याचे कौतुक तत्कालीन विद्वानांनी केलेले आढळते. या कोशानंतर विसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत ह्या पद्धतीची कोशरचना झाली नाही. या कोशाचे महत्त्व अबाधित आहे. या कोशासंदर्भात निबंधमालेत विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी अत्यंत मार्मिक उद्गार काढले आहेत. 'आपल्या मराठी भाषेबद्दल पाहिले तरी देखील तिच्या संबंधाचे अचाट काम म्हणजे कोश, हे इंग्रजांनीच आपल्याकरिता करून ठेविले आहेत. या कोशाची योग्यता अज्ञानास्तव व दुरभिमानास्तव आमचे लोक फारसे मानीत नाहीत, पण आमची अशी खात्री आहे की त्यांनी महाराष्ट्र भाषेवर जे उपकार करून ठेवले आहेत त्यास पार नाही! ते तयार करताना शास्त्री लोकांचे सहाय्य पुष्कळ घेतले व दोघा साहेबांस (मोल्सवर्थ व कँडी) त्या कामाबद्दल सरकारने मोठे बक्षीसही दिले हे खरे आहे, पण एवढ्यावरून नाक मुरडण्याचे कारण ते कोणते झाले" (निबंधमाला - अंक २). 'ज्ञानोदय'ने लिहिले, 'मोल्सवर्थ साहेबांच्या हातून असे मोठे काम ईश्वराच्या कृपेने तयार झाले हे पाहून आम्हास फार संतोष वाटतो. या कामावरून मोल्सवर्थ साहेबांची कीर्ती भरत खंडात अक्षय राहील यात शंका नाही' (ज्ञानोदय १ सप्टेंबर १८५७) या कोशाच्या द्वितीयावृत्तीत डॉ. विल्सन यांचा 'Notes on the constituent Elements the Diffusion and the Appllication of the Marathi Language' नावाच्या विचारप्रवर्तक निबंधाचा समावेश आहे. या निबंधात मराठी भाषा, तिचा विकास व तिचा अभ्यास करण्याची पद्धत यावर विचार व्यक्त केलेले आहेत. मोल्सवर्थ यांच्याविषयी त्यांचे मित्र रे. मिचेल लिहितात, "मोल्सवर्थचा स्वभाव लष्करी पेशाशी विसंगत होता म्हणून त्याने नोकरीचा राजीनामा देऊन तो मूळ मोल्सवर्थ बनला. त्याचे वागणे, बोलणे व शिष्टाचार उच्चकुलीन होते. त्याचे निरीक्षण सखोल होते. अद्यापही माझ्या माहितीत असा माणूस आला नाही. त्याने धर्मग्रंथाचा अभ्यास केला होता. अवघड अशा मराठी भाषेतील शब्दसमुच्चयावर

अधिक प्रकाश टाकला होता (Western India 1899 P. 262-263)"

मोल्सवर्थ यांनी १८३१ मध्ये मराठी-इंग्रजी कोशाचे काम पूर्ण झाल्यानंतर इंग्रजी-मराठी कोशरचनेचे काम तातडीने हाती घेतले. यासाठी त्यांनी 'Today's Edition of Johnson' हा कोश घेऊन कामास सुरुवात केली, मेजर कँडीनीही या कामी मदत केली. नंतर मोल्सवर्थ आजारी पडले व इंग्लंडला गेले. इंग्लंडमध्ये कोश पूर्ण करावा ह्या विचाराने त्यांनी सोबत कोशाची कागदपत्रेही नेली. परंतु प्रकृती अस्वास्थ्यामुळे कोशाचे काम होऊ शकले नाही. कोश पूर्ण व्हावा असे सरकारला वाटत होते म्हणून या कोशाची कामगिरी मेजर कँडीवर १८४० मध्ये सोपविण्यात आली, त्यांनीही कर्तव्यभावनेने व निष्ठेने ही कामगिरी पार पाडली.

मराठी-इंग्रजी कोशाव्यतिरिक्त मोल्सवर्थ यांनी 'शालापद्धती (१८२४), 'पापपीडितास शांती' (१८२८), 'ज्ञानमार्गाची सूचना' (१८४९) व `God Being Compassionate, why does man suffer' (१८५०) ही पुस्तके लिहिली. ते ख्रिस्ती धर्मप्रसार करणाऱ्या 'ट्रॅक्स ॲण्ड बुक सोसायटी' या संस्थेच्या पुस्तक तपासणी समितीत सदस्य होते. १८७२ मध्ये इंग्लंडमध्ये या मराठी पंडितांचे निधन झाले. शाळापुस्तक मंडळातील शास्त्री-पंडितामध्ये ते मोरेश्वर शास्त्री म्हणून प्रसिद्ध होते. मराठी भाषेच्या प्रेमापोटी निष्ठेने त्यांनी मराठीची सेवा केली. त्यांच्या मृत्यूनंतर सत्यदीपिकाकारांनी मोल्सवर्थ यांच्या स्वभावाचे यथार्थ वर्णन ज्ञानोदयात केले आहे. "मोल्सवर्थ साहेब एतद्देशीय लोकांशी फार प्रीतीने व स्नेहाने वागत असत. त्यांच्या कोशाच्या कामात सहाय्य करणारे जे शास्त्री त्यांजवळ होते त्यांस ते हे आपल्यातीलच एक वृद्ध शास्त्रीबुवा आहेत असे वाटत होते. त्यांपैकी जर कोणी अद्याप जिवंत असले व त्यांस ह्यांच्या मरणाची खबर समजली असती तर ते क्षणभर सुतक धरून स्नान केल्याशिवाय राहिले नसते." (ज्ञानोदय १ ऑक्टोबर १८७२)

मराठी साहित्यक्षेत्रात अजरामर कृती करणाऱ्या मोल्सवर्थ यांनी मराठी सारस्वतावर कायमचाच ठसा उमटवलेला आहे.

**संभाजी भोसले**

१४८०, सदाशिव पेठ, एस. पी. पोस्टासमोर, टिळक रोड, पुणे- ४११०३०

दूरध्वनी -४४९४४९९

## संदर्भ सूची

१) आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती : डॉ. कृ. भि. कुलकर्णी, १९५६

२) मराठी वाङ्मयाचा इतिहास– खंड ४ था - प्रा. रा. श्री. जोग, म. सा. प., १९६५

३) डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन रिपोर्टस् - १८४० ते १८९५

❑

# भीष्म साहनी



चंद्रकांत बांदिवडेकर

हिंदी साहित्यात मोलाची भर घालणारे डॉ. भीष्म साहनी यांचा जन्म ८ ऑगस्ट १९१५ रोजी रावळपिंडी (आता पाकिस्तानात) येथे झाला. १९३७मध्ये इंग्रजी साहित्य घेऊन त्यांनी एम. ए. ची उपाधी मिळवली आणि पुढे पीएच. डी. मिळवली. एम. ए. झाल्यावर काही वर्षे त्यांनी पिताजींना व्यापारात मदत केली. पण त्यांचा खर पिंड साहित्यिकाचा, नाटककाराचा, नटाचा. फाळणीनंतर ते मुंबईला आले आणि पुढे दिल्लीला जाऊन स्थायिक झाले. हिंदी, उर्दू, इंग्रजी, पंजाबी आणि संस्कृत या भाषा त्यांना उत्तम अवगत होत्या, पुढे १९५७ साली मास्कोच्या विदेशी भाषा प्रकाशनात प्रकाशनात अनुवादक म्हणून सुमारे चाळीस मित्रांबरोबर मास्को येथे ते राहायला गेले. तिथे रशियन भाषा शिकले आणि सात वर्षे तिथे वास्तव्य केले. या मुदतीत सुमारे २५ रशियन पुस्तकांचा अनुवाद त्यांनी हिंदीत केला. यात टॉलस्टॉयची 'रिसरेक्शन' कादंबरी, त्याच्या काही उत्कृष्ट लघुकथा समाविष्ट होत्या. घरातले वातावरण आर्यसमाजी होते. घरात साहित्यविषयाचीही खूप आवड होती. त्यांची एक आतेबहीण सत्यवती मलिक मातब्बर लघुकथाकार होती, तर त्यांच्या एका आतेबहिणीचे पती चंद्रगुप्त विद्यालंकार हिंदीतले सुप्रसिद्ध लेखक होते. प्रख्यात फिल्म अभिनेता बलराज साहनी भीष्म साहनींचे वडील बंधू. ते स्वतःही चांगले लेखक होते. भावाप्रमाणेच भीष्म साहनींना हॉकी खेळाची आणि नाटकात काम करण्याची आवड होती. अतिशय शांत स्वभावाचे आणि साधेपणाने राहणारे भीष्म साहनी लहानपणी काहीसे हूड होते. भीष्म साहनींनी 'मोहन जोशी हाजिर हो' मध्ये मुख्य कलावंताची भूमिका केली. तसेच, त्यांच्या 'तमस' कादंबरीवर आधारित चित्रपटातही त्यांनी भूमिका केली होती, बलराज साहनींनी त्यांना 'इप्टा' संस्थेने सादर केलेल्या नाटकात तीन छोट्या भूमिका दिल्या आणि भीष्म साहनींनी त्या उत्तमरीत्या वठवल्या.

त्यांच्यावर साम्यवादाचा वैचारिक प्रभाव तरुणपणापासून अखेरपर्यंत होता. कॉलेजात त्यांनी साम्यवादी विचारसरणीशी बांधीलकी असणाऱ्या प्राध्यापकांची संघटनाही संघटित केली होती. याबद्दल त्यांच्या पाठीमागे पोलिसांचा ससेमिरा होता. त्यामुळे त्यांच्या कॉलेजातल्या नोकऱ्या सुटल्या. पण भीष्म साहनींनी साम्यवादी संघटनांचे काम सोडले नाही. त्यांचा असा विश्वास होता की अशा संघटनांत काम करण्याने दृष्टिविस्तार होतो, अनुभवाची क्षितिजे










विस्तारतात. रजनी पामदत्त यांच्या 'रॉईज ऑफ नॅशनल सोशॅलिस्ट इन युरप' या पुस्तकाचा खूप प्रभाव साहनी यांच्या मनावर झाला. युरोपात जोर पकडू लागलेल्या फॅसिस्ट शक्तींचे स्वरूप त्यांना आकळले. फाळणीनंतर उद्भवलेल्या भयानक दंगलीचे स्वरूप त्यांना अस्वस्थ करू लागले. एका गावातील विहिरीत अनेक स्त्रियांनी आपल्या छोट्या मुलांना फेकून स्वत: जीव देण्याचा प्रयत्न केला आणि त्यांची फुगून आलेली मृत शरीरे पाहून त्यांचे नातेवाईक त्यांना ओळखण्याचा प्रयत्न करीत होते. या दृश्याचा त्यांच्या मनावर खूप परिणाम झाला. या सर्व परिस्थितीचे त्यांच्या 'तमस', 'झरोखे', 'मय्यादास की माडी' या कादंबऱ्यांत प्रतिबिंब पडलेले आहे. त्या वेळच्या हिंदी कथा साहित्याचाही मोठा प्रभाव त्यांच्या मनावर पडला. ७ कादंबऱ्या, ८ कथासंग्रह, ४ नाटके, १ निबंध संग्रह त्यांच्या नावावर आहेत. शिवाय मुलांसाठी लिहिलेल्या साहित्याचे संकलन दोन संग्रहांत केलेले आहे. अनेक प्रतिष्ठित संस्थांनी त्यांचा सन्मान केला, त्यांच्या 'तमस' कादंबरीला १९७६ चा साहित्य अकादमी पुरस्कार प्राप्त झाला. (या कादंबरीचे समीक्षण 'देशीवाण' या समीक्षा ग्रंथात वाचायला मिळेल.) अफ्रो-एशियाई लेखक संघाने १९८० मध्ये त्यांना 'लोटस' पुरस्कार प्रदान केला.

भीष्म साहनी मुख्यत: कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांची पहिली कादंबरी 'झरोखे' १९५७ मध्ये प्रकाशित झाली. या कादंबरीचा नायक आहे एक बालक. त्याच्या दृष्टीतून त्यांनी मध्यमवर्गीय घरातील वातावरणाचे चित्रण केले आहे. विशेषत: या वातावरणाचा प्रभाव बालकाच्या मनावर कसा पडतो आणि त्यातून एक प्रकारची पाप-भावना कशी निर्माण होते याचे विश्लेषण केले गेले आहे. पंजाबी आर्यसमाजी कुटुंबातला हा बालक आसपास घडणाऱ्या घटना चकित नजरेने पाहतो आहे. या कुटुंबातील माणसांच्या मनात भय, न्यूनगंड, शंका, कामगंड कसे निर्माण होतात, याचे चित्रण केले आहे. एक प्रकारे भीष्म साहनींनी आपल्याच जीवनाचे चित्रण केले आहे असे वाटते. 'कडियाँ' (१९७०) मध्ये, पुरुषसत्ता स्त्रीवर कसा अन्याय करत असते आणि त्यातून कौटुंबिक स्वास्थ्य कसे नष्ट होते याचे चित्रण त्यांनी केले आहे. त्याचबरोबर वैवाहिक जीवनाचे होत जाणारे विघटन शेवटी माणसाला कसे दु:खी करते हे दाखवले आहे. भीष्म साहनींची गाजलेली कादंबरी 'तमस' (१९७३). हिंदू, मुसलमान, शीख धर्मियांचा आपसातील अविश्वास, विरोध, कटुता, संशय आणि हिंस्रता यांचे प्रभावी चित्रण या कादंबरीत केले आहे. धार्मिक उन्माद आणि हिंस्रता यांच्या प्रभावी वर्णनाबरोबरच या ऐतिहासिक तेढीच्या मागची इंग्रज सत्तेची 'फोडा आणि झोडा' भूमिकाही स्पष्ट होते. याची समीक्षा करताना असं जाणवतं– ''ही कादंबरी साहनींच्या सामाजिक बांधिलकीची ग्वाही देते, पण कलात्मक मूल्यांविषयी प्रश्न उत्पन्न करते.'' (पृ. १८३, देशीवाण, चंद्रकांत बांदिवडेकर) यातले प्रसंग सुटे सुटे चित्रमय आहेत, रसवत्तेनं भरलेलेही आहेत, पण एकूण कादंबरीची संरचना खूपच ढिसाळ आहे.

यानंतरच्या 'बसन्ती'मध्ये दिल्लीसारख्या वाढत्या महानगरांच्या बरोबर सरकारी जमिनीवर वाढत जाणारे अनेक धंदे, रोजगार करणाऱ्या गरिबाच्या, मजुरांच्या वस्त्यांचं चित्रण आहे. या वाढत्या झोपडपट्टीतल्या जीवनाचं– दु:खाचं आणि सुखांचं चित्रण करण्यात साहनी



अनुक्रमणिका

यशस्वी झाले आहेत. यात बसन्ती नावाच्या स्त्रीच्या सर्वांगीण शोषणाच्या आधारे स्त्रीच्या जिजीविषेचं आणि शक्तीचं प्रभावी चित्र रेखाटलं आहे. यात पंजाब, हरियाणा, उत्तर प्रदेश, राजस्थान यातून आलेल्या बेरोजगार माणसांच्या जीवनाचं चित्रण आहे. या बेरोजगार श्रमिकांच्या श्रमावर वाढणाऱ्या नगरीत सर्वांत जास्त असुरक्षित जीवन कंठित आहेत ते श्रमिक. धनदांडग्यांच्या शोषणाच्या तऱ्हा, त्यांना साथ देणारी नोकरशाही आणि पोलीस यांच्या पार्श्वभूमीवर हलाखीचं जीवन जगणाऱ्यांच्या जीवनावस्थांची स्थिती-गती रंगवताना बसन्तीसारख्या झोपडपट्टीतील तरुण मुलीवर होत जाणाऱ्या नागर संस्कारांचं मनोवेधक चित्र यात रेखाटलं आहे. तिच्या मनाला आकार देणाऱ्या फिल्मी दुनियेचा (कारण या दुनियेत संस्कार करणारं तेवढंच साधन शिल्लक असतं.) संकेत केला आहे. बसन्ती विवाहित असूनही दिनूच्या-आपल्या प्रियकराच्या घरी राहते, अनेक प्रकारे त्यांना मदत करते, पण शेवटी जीवनसंघर्षात सर्व प्रकारे हरते आणि देशोधडीला लागते. महानगरातल्या या अस्थायी जीवनराहाटीचं प्रभावी चित्र साहनी काढतात. (बसन्ती आणि माहिमची खाडी यांचा एक तुलनात्मक अभ्यास करता येईल) नागर संस्कृतीच्या तळाशी खतासारखं जगणारं हे श्रमजीवी वर्गाचं चित्रण फार सहानुभूतीनं आणि ताकदीनं लेखकानं चितारलं आहे.

"मय्यादास की माडी" (१९८८) पुढची कादंबरी. शिखांच्या हुकमतीचा शेवट इंग्रजांनी केला आणि आपले साम्राज्यशाहीचे पाय रोवायला प्रारंभ केला त्या काळचे चित्रण करणारी ही कादंबरी (१८४०-१९२०). या काळाचं रेखाचित्र ती आपल्यासमोर ठेवते. या पाऊणशे वर्षांच्या राजनैतिक-सामाजिक वास्तव आणि त्यातील परिवर्तन हा या कादंबरीचा आशय आहे. शीख आणि इंग्रज यांच्या सत्ता-संघर्षाची आणि शिखांच्या पराजयाची ही कथा. जमीनदारांनी इंग्रजांना मदत केली आणि आपली जमीन जायदाद काही काळ टिकवली पण नंतर जमीनदारांचा ऱ्हास झाला, सावकार वरचढ झाले. भारतात इंग्रजांचे राज्य यांच्या सहयोगांवरच टिकले, विस्तारले– त्याची ही कथा, 'मय्यादासचा वाडा 'या पडझडीचे प्रतीक ठरते.

भीष्म साहनींच्या पुढच्या 'कुंजो' (१९९३) कादंबरीत सामाजिक/राजनैतिक पार्श्वभूमी क्षीण होते आणि माणसांमाणसांतील संबंधावर आणि मनाच्या हालचालीवर त्यांची दृष्टी केंद्रित होते. विशेषतः स्त्री-पुरुषांमधल्या प्रेमाच्या वेगवेगळ्या संबंधांवर ते कादंबरीची उभारणी करतात. मात्र त्यात अपेक्षित खोली किंवा प्रातिभ स्पर्श फारसा जाणवत नाही. त्या मानाने त्यांची सन २००० मध्ये प्रकाशित झालेली 'नीलू नीलिमा नीलोफर' अधिक समर्थ कादंबरी वाटते. एका बाजूला ही प्रेमकथा आहे, पण या कथेच्या पार्श्वभूमीत धार्मिक ताणतणाव आहेत. स्वतंत्र भारतातील हिंदू-मुसलमान यांच्यातील ताणांची ही कथा आहे. यातील हिंदू-मुसलमानांच्या जीवनराहाटीचे, पोशाख, भोजन, रीतिरिवाज, विचारधारा यांचं अतिशय प्रामाणिक चित्रण भीष्म साहनी यांनी केले आहे. दोन्ही धर्मांवरील प्रगतिशील विचारांचा प्रभाव आणि सामर्थ्य आणि मर्यादा यांचंही भान त्यांनी ठेवलं आहे. कारण शेवटी लेखकाला आपल्या भोवतालच्या वास्तवाचं भान ठेवावंच लागतं.

भीष्म साहनींनी ज्या कादंबऱ्या लिहिल्या त्यांच्या मर्यादा लक्षात घेऊन सुद्धा 'तमस'



अनुक्रमणिका

'बसन्ती' 'मय्यादास की माडी' आणि 'नीलू नीलिमा नीलोफर' या चांगल्या कादंबऱ्या म्हणून सांगता येतील.

भीष्म साहनी कादंबरीकार होते, पण त्याहीपेक्षा ते अधिक मोठे कथाकार होते. संरचनेच्या दृष्टीने साहनींच्या कादंबऱ्या काहीशा अस्ताव्यस्त आणि कमी बांधेसूद वाटतात. पण त्यांच्या कथा सौष्ठवाच्या दृष्टीने सुगठित आहेत, त्यांचा पहिला कथासंग्रह 'भाग्यरेखा' १९५३ मध्ये प्रकाशित झाला. त्यानंतर पहला पाठ (१९५६), भटकती राख (१९६६), पटरियाँ (१९७३), वाङ्‌चू (१९७८), शोभायात्रा (१९८१), निशाचर (१९८३), पाली (१९८९) हे कथा-संग्रह प्रकाशित झाले.

भीष्म साहनींची लेखकीय सहानुभूती समाजातील दलित, पीडित, शोषित वर्गाविषयी होती आणि ती केवळ बौद्धिक नव्हती, तर हार्दिकही होती. त्याच्या कथांचा परिवेश सामान्यत: शहरातील मध्यमवर्गाचा असला तरी मध्यम वर्गाचं, विशेषत: निम्नमध्यम वर्गाचं चित्रण करताना भीष्म साहनींच्या सहानुभूतिपूर्ण सहृदय संवेदनेचा उत्कट प्रत्यय येतो आणि उच्च मध्यम वर्गाचा सर्व स्तरांवरचा उच्चभ्रूपणा दाखवताना त्यांची लेखणी काहीशी उपरोधिक होते. मात्र ती कधी एकांगी धारदार होत नाही. याचे कारण असे की भारतीय सांस्कृतिक परिवेश आणि उच्च जीवनमूल्ये यांच्याशी त्यांची बांधिलकी कधी अस्थिर होत नाही. भीष्म साहनी जीवनाच्या धगधगत्या वास्तवातून आपल्या घटना, पात्रे आणि परिस्थिती उचलतात आणि कथेचे बीज सहजपणे उमलू, फुलू देतात. म्हणूनच त्यांच्या कथेत त्यांची साम्यवादाबद्दल आस्था कधी असंयतपणे डोकावत नाही, कोणत्याही प्रकारची दाखवेगिरी तिथे नसते. त्यांच्यातील सहजता, अकृत्रिमता आणि कथावस्तूशी तल्लीनतेची तारीफ करताना मर्मज्ञ कथाकार विष्णू प्रभाकर म्हणतात, ''भीष्म साहनी व्यक्तिरेखेच्या विकासासाठी प्रयास करताना दिसत नाहीत, खरे तर महान व्यक्तिरेखा तीच की जी स्वत:च पुढे जात राहते. 'अमृतसर आ गया है' मधल्या बाबूसंबंधी असेच घडले आहे. त्याची मानसिकता स्वत: भीष्म साहनी जगले आहेत असे वाटते. या बाबतीत मी भीष्म साहनींना यशपालपेक्षा वरचे मानतो. विशेषत: विभाजनाची शोकांतिका अनुभवून त्यांनी ज्या व्यक्तिरेखा निर्माण केल्या आहेत त्यात सर्व अवस्था मोठ्या सहजपणे आकार घेतात.'' डॉ. नामवरसिंह म्हणतात, ''साधेपणा आणि सहजता भीष्मजींच्या कथेची अशी वैशिष्ट्ये आहेत की जी प्रेमचंद सोडले तर दुसऱ्या कुठेच दिसत नाहीत. जीवनातील विडंबनापूर्ण अवस्थांवरची भीष्मजींची पकड अप्रतिम असते. असे विडंबन त्यांच्या अनेक चांगल्या कथांचे प्राणतत्त्व आहे.'' त्यांची फाळणीच्या वेळची आणि नंतरची परिस्थिती प्रत्यक्ष अनुभवल्यामुळे त्यावर आधारलेल्या त्यांच्या अनेक कथा महत्त्वाच्या ठरल्या आहेत. 'चीफ की दावत', 'अमृतसर आ गया है', 'ओ हरामजादे' 'वाङ्‌चू', 'यास', 'लीला नंदलाल की' इ. कथा विशेष रसिकमान्य झाल्या.

भीष्म साहनी स्वत: अभिनेते होते, बालसाहित्य आणि रंगमंच याबद्दल त्यांना विशेष ओढ होती. त्यांची 'हानूश' (१९७७), 'कबिरा खडा बाजार में' (१९८१), 'माधवी' (१९८४), आणि 'मुआवजे' (१९९३) नाटके विशेष प्रसिद्ध आहेत.



अनुक्रमणिका

'हानूश' एक कलाकाराच्या आत्मसंघर्षाची, कलाकार आणि आत्मकेंद्रित कलाविक्रेत्यांच्या संघर्षाची नाट्यकथा आहे. पाचशे वर्षांपूर्वी प्रागमध्ये हानूश नावाचा कुलुपे बनवणारा मेस्त्री होता. त्याने घड्याळाविषयी काही ऐकले आणि त्याच्या मनात घड्याळ बनवण्याची आकांक्षा निर्माण झाली आणि वाढली, सुमारे १७ वर्षे प्रयत्न करून आणि जेकब नावाच्या नोकराच्या मदतीने त्याने घड्याळ बनवले. कमावत्या, संसाराचा गाडा रेटणाऱ्या हानूशला थोडेसे अर्थसाहाय्य व्यापारीवर्गाकडून मिळाले. पण अट अशी घातली गेली की त्याने घड्याळ व्यापाऱ्यांच्या संमतीने ठरलेल्या जागी लावायचे. अनेक आशा-निराशांच्या झटक्यातून, घरच्या लोकांच्या हालअपेष्टातून पुढे जात हानूश घड्याळ तयार करतो. कलावंताच्या दुर्दमनीय आत्मशक्तीतून हे यश त्याला मिळते. व्यापारी वर्गाने निःस्वार्थ भावनेने मदत केलेली नव्हती. त्यांना आपला व्यवसाय उर्जितावस्थेत आणायचा होता, राजावरील चर्चच्या पाद्ऱ्यांचा प्रभाव कमी करायचा होता. त्यांनी नगराच्या चौरस्त्यावर मनोऱ्यावर घड्याळ लावले. बादशहाच्या हस्ते उद्घाटन झाले. हानूशचा सन्मान करण्यात आला. व्यापाऱ्यांना त्यातून व्यापारही करायचा होता. देशविदेशातून लोक घड्याळ पाहायला येत. आपल्या वाड्यात घड्याळ टांगले गेले नाही याचा राग बादशहाच्या मनात होताच. त्याने तर हानूशने पुन: दुसरे घड्याळ बनवून आपल्या नगराचे महत्त्व कमी करू नये म्हणून त्याचे डोळेच काढले. यामुळे हा हानूश भयंकर त्रासला, पण त्याच्या कलावंताच्या आत्मिक शक्तीची आणखी एक परीक्षा होते. घड्याळ नादुरुस्त होते. त्याच्या मनात घड्याळ नष्टच करायचे होते, पण घड्याळाजवळ जाताच त्याचा कलावंत आत्मा हा क्रूर खेळ आपल्या कलाकृतीशी करू देत नाही. तो घड्याळ पुन: सुरू करतो. बादशहाला एका कलावंताचे हे दान होते. आरंभी एक सामान्यसा वाटणारा हानूश अनेक प्रकारच्या संघर्षातून महान कलावंत बनतो. हे नाटक वाचताना कलावंताच्या महान होत चाललेल्या व्यक्तिमत्त्वाचा साक्षात्कार होत जातोच, पण कलावंताचे शोषण करणाऱ्या वर्गीय शक्तींचे स्वरूपही उद्धारित होते– कलावंत आपल्या सृजनतेच्या अभिव्यक्तीसाठी धर्म, शासन यांच्याशी लढा देतो, तसा व्यवसायीकरण करणाऱ्या शक्तींशीही लढा देतो. मध्ययुगीन परिस्थितीतही आधुनिक जगाला भावेल अशी कलाकृती भीष्म साहनींनी निर्माण केली आहे.

भीष्म साहनींचे दुसरे नाटक 'कबिरा खडा बाजार में'. आपल्या वेळच्या समाजातील अन्याय्य शक्तींशी, अन्यायाशी संघर्ष करणारे संत कबीराचे व्यक्तिमत्त्व या नाटकात साकार करण्यात भीष्म साहनींना यश मिळाले आहे. यात कबीराचे लढाऊ, फक्कड, अक्कड, मूल्यधर्मी व्यक्तिमत्त्व उभे केले आहे. यात हुकुमशाही (शाहनशाह सिकंदर लोधी, काली नगराचा कोतवाल इ.) विरुद्ध लढणारा सामान्य माणूस असे द्वन्द्व उभे केले आहे. इतिहास आणि आधुनिकता यांच्या मेळातून ही कलाकृती जिवंत होते. यातील पात्रांना प्रतीकात्मक अर्थ मिळून अनेक आयामी जीवन रूप साकारते. सावकाराच्या उनाड, चैनी, तरुण मुलावर भाळलेली लोई (कबीराची पत्नी) कबीराची महानता बघून पूर्णपणे बदलते. तिच्यामध्ये एक जबाबदारीनं वागणाऱ्या पत्नीचं रूप साकार होतं. समाजातील कुप्रवृत्तींविरुद्ध संघर्ष करणाऱ्या

कबीराच्या स्वत:च्या मनातही एक संघर्ष पेटलेला असतो. त्याचं मन दोन्ही संघर्षात महान होत जातं. याचा एक जिवंत अनुभव हे नाटक देतं.

पौराणिक किंवा मिथ्य कथांचा उपयोग करून आधुनिक आणि समकालीन जीवनातील समस्या आणि मानसिकता सामर्थ्याने ध्वनित करणे हे हिंदी साहित्याचे एक मोठे वैशिष्ट्य आहे. मैथिलीशरण गुप्त यांच्यापासून धर्मवीर भारती/भीष्म साहनींपर्यंत मोठी आणि सशक्त परंपरा या वाङ्मयाची आढळते. भीष्म साहनींचे नाटक 'माधवी' या परंपरेतील आहे. यात विश्वामित्राच्या अश्वमेध यज्ञासाठी आठशे घोडे, शिष्य गालवकडे मागितले जातात व त्यासाठी आर्थिकदृष्ट्या दुर्बल झालेला राजा ययाती आपल्या मुलींचे– माधवीचे दान करतो. ही महाभारतातील कथा आधार म्हणून घेतलेली आहे. शेवटी स्त्रीला स्वत:चे अस्तित्व नसते, स्वातंत्र्य नसते. ती एक पुरुषी स्वामित्वाचे साधन असते, हे चिरंतन तत्त्व नाट्यरूपाने मांडले आहे. त्यांचे 'मुआवजे' नाटक दंग्यांच्या पार्श्वभूमीवर आधारित असून यात शासकीय अधिकाऱ्यांच्या विवेकशून्यपणावर, मध्यमवर्गीय लोकांच्या अकर्मण्यतेवर आणि निर्धन जनतेच्या दु:खावर प्रकाश टाकण्यात आला आहे. मानवीमूल्यांच्या ऱ्हासाचे आणि आधुनिक जीवनाच्या शोकांतिकेचे यात केलेले नाट्यात्मक प्रकटीकरण प्रेक्षकांना अस्वस्थ करते. शहराच्या बाहेर सीमारेषेवर राहणाऱ्या बेघर समाजाच्या यातनांचे प्रभावी चित्र यातून लोकांसमोर ठेवलेले आहे. धार्मिक कट्टरता आणि संवेदनाशून्य प्रशासनिक व्यवस्था यात भरडल्या जाणाऱ्या समाजाचे हे चित्र आहे. भीष्म साहनी हे मार्क्सवादी होते. साहजिकच त्यांच्या सर्वच लेखनातून वर्ग-कलहाचा दृष्टिकोन, उच्च वर्गाची अन्याय्य जीवनप्रणाली, शासनव्यवस्थेची जनहित-बधिर वृत्ती, भांडवलशाहीची शोषणाची प्रक्रिया आणि त्याला साजेशी क्रूर वर्तणूक या बाबी चित्रित वा ध्वनित होत असतात. त्यांच्या सर्वच कृतीत बांधिलकीचा सूर व्यापून राहिलेला असतो. त्यांची दोन नाटके 'हानूश' आणि 'कबिरा खडा बाजार में' नाट्यमंचाच्या दृष्टीने महत्त्वाच्या कृती आहेत.

भीष्म साहनी यांनी काही काळ (१९६५-६७) 'नई कहानियाँ' पत्रिकेचे संपादन केले आणि काही नव्या दमाच्या लेखकांना प्रसिद्धी दिली. त्यांचे काही निबंध, संभाषणात्मक लेख, आलोचनात्मक टिपणे, 'अपनी बात' पुस्तकात समाविष्ट आहेत.

भीष्म साहनी विशिष्ट विचारधारेशी बांधिल असले तरी मनाने मोकळे, नव्या कल्पनांचे/विचारांचे स्वागत करणारे होते. त्यांच्या स्वभावात विलक्षण ऋजुता होती. विरोध करतानाही त्यांचा मूलभूत अभिजातीय स्वभाव आणि स्नेहपूर्ण व्यक्तित्व कधी लोपून जात नसे. त्यामुळे त्यांच्या विचारांशी असहमत असणारे लेखकही त्यांच्याबद्दल स्नेह व आदर बाळगून असत. त्यांच्या मृत्यूने (१०-७-२००३) संपूर्ण हिंदी लेखकवर्ग आणि वाचकवर्ग खूपच हळहळला, यात आश्चर्य नाही.

**डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर**

एफ/१८, कल्पनामती हौसिंग सोसायटी औंध रस्ता, पुणे ७ (फोन : ५८८७९२७)





अनुक्रमणिका








# हा तों साहित्य कुसुमांचा आस्वादु



## राज्यघटनेचे अर्धशतक : नरेंद्र चपळगावकर

*(राज्यघटनेचे अर्धशतक : नरेंद्र चपळगावकर मौज प्रकाशन गृह गिरगाव- मुंबई -४)*

**डॉ. वि. मा. बाचल**

१५ ऑगस्ट १९४७ रोजी भारत स्वतंत्र झाला. त्यानंतरच्या संक्रमणकाळात संस्थानांच्या विलीनीकरणाचा प्रश्न, फाळणीनंतर निर्माण झालेले प्रश्न सोडवीत असतानाच, १९४६ साली नेमण्यात आलेल्या घटना समितीने आपले कार्य चालू ठेवले. २६ नोव्हेंबर १९४९ रोजी घटनेचा स्वीकार करण्यात आला आणि २६ जानेवारी १९५० रोजी घटनेत अपेक्षिल्याप्रमाणे भारत हे सार्वभौम प्रजासत्ताक बनले, आणि नव्या घटनात्मक युगाचा कालखंड सुरू झाला. २६ जानेवारी २००० रोजी राज्यघटनेच्या अमलाचे अर्धशतक पार पडले. या अर्धशतकाच्या प्रयोगाचे मूल्यांकन करण्याचा प्रयत्न न्या. नरेंद्र चपळगावर यांनी 'राज्यघटनेचे अर्धशतक' या पुस्तकात केला आहे. राज्यशास्त्र आणि कायदा यांचे अभ्यासक, वकील, न्यायाधीश यांपेक्षा जागरूक नागरिक हा वाचक लेखकाने आपल्या नजरेसमोर ठेवला आहे आणि त्यात चांगले यश लाभले आहे.

राज्यघटना ही त्या देशाची जनसंमत राजकीय व्यवस्था असते त्यामुळे त्या राष्ट्राच्या निर्मितीच्या प्रक्रियेतून जी मूल्ये उत्क्रांत झाली, त्या मूल्यांच्या आधारावर राज्यघटनेची चौकट उभी राहते. ही राज्यघटना सरनामा आणि इतर तरतुदींच्या द्वारा– उदा. राजकीय, सामाजिक आर्थिक न्याय विचार, श्रद्धा, उपासना, संघटना यांचे स्वातंत्र्य; दर्जा व संधी यांची समानता, बंधुता इ. चे आश्वासन देते. हे घटनात्मक आश्वासन कितपत पाळले गेले, नागरिकांच्या हक्कांचे पालन, घटनात्मक संस्थांचे पावित्र्य या बाबतीत शासनाने आपली जबाबदारी पार पाडली का, नागरिकांकडून अपेक्षित असलेला प्रतिसाद लाभला का, कोण, कुठे आणि कसे वागले इत्यादी प्रश्नांची उत्तरे तटस्थपणे शोधण्याचा लेखकाने नम्र आणि प्रामाणिक प्रयत्न केला आहे. घटना कशी आहे यापेक्षा ती राबविणारी माणसे कशी आहेत. हे अधिक महत्त्वाचे आहे असे घटनासमितीचे अध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी म्हटले आहे, तर कोणतीही घटना राबविताना ती राबविणाऱ्यांच्या ठायी घटनात्मक नीतिमत्ता कितपत आहे हे पाहणे आवश्यक ठरते असे मसुदा समितीचे अध्यक्ष डॉ. आंबेडकर यांनी म्हटले आहे. अशी नीतिमत्ता नसलेले शासक आणि नागरिक चांगल्या घटनेचा बोजवारा उडवितील, तर अपेक्षित नीतिमत्ता असेल तर सर्वसाधारण घटनाही उत्तमप्रकारे राबविली जाईल. भारतात गेल्या अर्धशतकात काय झाले याचा अभ्यास वरील निकषांवर तपासणे महत्त्वाचे ठरते.



अनुक्रमणिका

प्रास्ताविकात ही भूमिका स्पष्टपणे नमूद करून लेखकाने आपल्या चिकित्सेचा पाया घातला आहे आणि त्या आधारे संघराज्य, लोकशाही, स्वातंत्र्य, समता, धर्मनिरपेक्षता या भारतीय संविधानाच्या सरनाम्यात (Preamble) उल्लेखिलेल्या मुख्य संकल्पना आणि प्रत्यक्ष व्यवहारातील यशापयश यांचे विवेचन केले आहे.

पहिल्या 'राज्यघटनेची घडण' या प्रकरणात घटनासमितीची स्थापना, तिच्या उपसमित्या, मुख्य मसुदा समितीचे कार्य, मसुदा समितीतील आणि त्यानंतर मुख्य घटना समितीतील चर्चेचा आढावा, नेहरू, आझाद, राधाकृष्णन, अय्यंगार, अल्लादी, कृष्णस्वामी अय्यर इत्यादींचे योगदान विशद केले आहे. मूळ घटनासमितीच्या निवडीत डॉ. आंबेडकरांना मुस्लिम लीगच्या पाठिंब्यावर निवडून यावे लागले, कारण चले जाव चळवळीस असलेल्या आंबेडकरांच्या विरोधामुळे काँग्रेसचा पाठिंबा नव्हता. मात्र फाळणीनंतर मुस्लीम लीगचे सभासद बाहेर पडले आणि बॅ. जयकरांच्या राजीनाम्यामुळे रिक्त झालेल्या जागेवर निवडण्यासाठी काँग्रेसनेच आंबेडकरांना घटनासमितीवर बिनविरोध निवडून आणले. आंबेडकर वैचारिक बंडखोर असले तरी त्यांच्या राजकारणाचा पिंड सनदशीर व घटनात्मक होता. हे लक्षात घेऊन काँग्रेसने भूमिका बदलली, हे लक्षात घ्यावयास हवे. घटनासमितीच्या मूळ संकल्पनेपासून तिचा विकास कसा झाला, कोणते वैचारिक प्रवाह महत्त्वाचे ठरले, कोणत्या कायद्यांचा प्रभाव पडला हे लेखकाने विस्ताराने सांगितले आहे. आंबेडकरांप्रमाणेच व्ही. पी. मेनन आणि बेनेगल नरसिंग राव यांचेही योगदान स्पष्ट केले आहे. दुसऱ्या 'संघराज्य' या प्रकरणात केंद्रशासन आणि घटकराज्य शासने यांच्यातील अधिकारांची वाटणी स्पष्ट करून भारतीय संघराज्य केंद्राला झुकते माप देणारे केंद्रित संघराज्य, किंवा अंशत: संघराज्य (Quasifederal) कसे आहे, भाषावर प्रांतरचनेचे चांगले-वाईट परिणाम, प्रांतिक अस्मितेचा वाढता प्रभाव, आंतरराज्य विवाद मिटविण्याची यंत्रणा, घटनेतील ३५६ व्या कलमाच्या अंतर्गत राज्यपालांद्वारे घटकराज्याचे अधिकार कमी करण्याची तरतूद, वित्तमंडळ, योजना आयोग आणि राष्ट्रीय विकास मंडळ (National Development Council) इत्यादी यंत्रणांच्या द्वारे राबविल्या जाणाऱ्या धोरणांमुळे संघराज्याच्या व्यवहारावर होणारे परिणाम इत्यादींचे विस्तृत विवेचन करण्यात आले आहे. वास्तविक पाहता ३५६ व्या कलमाचा वापर अपवादात्मक परिस्थितीत, घटक शासन घटनेनुसार चालत नसेल, तेव्हाच करावा अशी अपेक्षा आहे. प्रत्यक्षात मात्र सर्वच राजकीय पक्षांनी केंद्रात सत्तेवर असताना आपणास विरोध करणाऱ्या पक्षांची घटकराज्याची सरकारे बरखास्त केली आहेत. १९७७ मध्ये जनता पक्षाने आणि त्याच न्यायाने इंदिरा गांधी सरकारने १९८० मध्ये बिगरकाँग्रेसी सरकारे घाऊक पद्धतीने बरखास्त केली. १९९२ साली पी. व्ही. नरसिंहरावांनी याच तर्कबुद्धीने चार राज्यांची बहुमतात असलेली भारतीय जनता पक्षाची सरकारे बरखास्त केली. घटनेच्या कलमाचा सर्व पक्षांनी स्वत:च्या सोयीनुसार अर्थ लावला आणि घटनेशी प्रतारणा केली, असे खेदपूर्वक नमूद करावेसे वाटते. घटकराज्याचा प्रमुख राज्यपाल होय. राज्यपालाने

तटस्थ वृत्तीने परिस्थितीचे परिशीलन करून केंद्र शासनास शिफारस करावयाची असते. प्रत्यक्षात मात्र बहुतेक ठिकाणी राज्यपाल हे केंद्राचे एजंट या भूमिकेतून निर्णय घेत असे आढळले. काही खटल्यात या भूमिकेवर न्यायालयांनी कठोर टीका केली आहे :

"राष्ट्रपतींचा हा अधिकार (कलम ३५६ नुसार) अपवादात्मक स्वरूपाचा आहे... राष्ट्रपतींवर राज्यातील घटनात्मक सरकारचे संरक्षण करण्याची जबाबदारी टाकण्यात आली आहे... केंद्रात सत्तेवर असलेल्या राजकीय पक्षाचे हितरक्षण करण्यासाठी अगर त्यांच्या हितसंबंधाचा फायदा करण्यासाठी राजकीय विरोधकांविरुद्ध वापरण्यासाठी उपलब्ध करून दिलेले हे हत्यार नाही..." न्या. रेड्डी... पुढे म्हणतात–

"अधिकाराच्या प्रत्येक दुरुपयोगाचे परिणाम होतच असतात. ते ताबडतोब दिसले नाहीत, तरी काही वर्षांनंतर त्यांचे गांभीर्य प्रगट होऊ लागते. झुळूक आहे असे आज वाटेल, उद्या त्यातून वादळ प्रगट होईल. शहाणपण संयमात आहे. अतिरेकात नाही."

आज भारतीय जीवनात बऱ्याच बाबतीत अधिकारांचा दुरुपयोग होत असताना आढळतो. न्यायमूर्तीचा हा इशारा सर्वांनी लक्षात घेण्यासारखा आहे.

संघराज्याच्या आर्थिक रचनेत वित्त आयोगाला अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे. वित्तआयोग ही घटनात्मक यंत्रणा आहे. मात्र गेल्या पन्नास वर्षांत घटनेतर योजना– आयोग आणि राष्ट्रीय विकास मंडळ यांनाच अधिक महत्त्व प्राप्त झाले आहे. या दुय्यम वागणुकीबाबतची खंत वित्त आयोगाच्या अहवालात व्यक्त झाली आहे. योजना आयोगाने ठरवायचे आणि वित्त आयोगाने मम म्हणावयाचे हे कशासाठी?

प्रांतिक स्वायत्ततेबद्दल परखड विश्लेषण लेखकाने केले आहे, ते असे :

स्वातंत्र्य किंवा स्वायत्तता ही घटनेच्या शाब्दिक तरतुदींनी मिळत नसते. स्वातंत्र्याप्रमाणेच स्वायत्ततेची किंमत मोजावी लागते. केंद्राकडून घेतलेली कर्जे कधीच फिटणार नाहीत एवढी दिवाळखोर अवस्था ज्या राज्यांची असते त्यांनी स्वायत्ततेची अपेक्षा करणे व्यर्थ आहे. सत्ता टिकविण्यासाठी अंथरूण न पाहता पाय पसरणारी राज्य सरकारे हा संघराज्याला धोका आहे. माणूस दुबळा झाला की लाचार बनतो, राज्य दुबळे झाले की ते स्वायत्तता गमावून बसते. प्रांतांना त्यांच्या चुका दाखवणारे समर्थ केंद्रीय नेतृत्व असणे हा भारतीय संघराज्यापुढील महत्त्वाचा प्रश्न आहे.

तिसऱ्या 'लोकशाही' या प्रकरणामध्ये लोकशाहीविषयी सैद्धांतिक चर्चा करून भारतीय लोकशाहीतील पक्षांचे राजकारण, निवडणूक पद्धती, प्रबळ विरोधी पक्षांचा अभाव, पक्षांतर्गत लोकशाहीचा अभाव, उदंड झालेल्या राजकीय पक्षांची सौदेबाजी, कार्यक्रमांच्या आधारे मते न मिळवता जाती, धर्म, भाषा, आर्थिक बळ, हिंसात्मक राजकारणाचा वाढता प्रभाव यांची लेखकाने दखल घेतली आहे.

निवडून आलेल्या प्रतिनिधींचे वर्तन, संसदीय कामकाजामध्ये होणारा वेळेचा प्रचंड अपव्यय, कोट्यवधी रुपयांच्या मागण्या बिनाचर्चा मंजूर होणे, खर्चिक निवडणुका आणि

बहुतेक पातळ्यांवर काळ्या पैशाचा प्रचंड वापर होणे, व्यक्तिस्तोम इत्यादी दोषांचे परखड विवेचन केले आहे. एका अधिवेशनामध्ये ८-१० तास कामकाज बंद पडले तर मधु लिमये आणि स्वत: पंतप्रधान नेहरू अत्यंत अस्वस्थ झाले. "आपल्या सार्वजनिक जीवनात अपेक्षित असलेली किमान प्रतिष्ठा कमी होत आहे, सौजन्य मावळत आहे, त्यामुळे आपल्या संस्था, आपल्या विधानसभा, आपली संसद यांची अधोगती होत आहे. युरोपातील अनेक लोकशाही संस्था आणि सरकारे अशा वागण्याने कोसळली हे लक्षात ठेवले पाहिजे." नेहरूंचा हा चाळीस वर्षांपूर्वीचा इशारा पाहिल्यावर आजच्या परिस्थितीबद्दल काय म्हणावे?

चवथ्या प्रकरणामध्ये 'स्वातंत्र्या'संबंधी विवेचन आहे.

व्यक्तिगत स्वातंत्र्यासंबंधी भारतीय घटनेने कलम १९ ते ३२ मध्ये विस्तृत तरतुदी केल्या आहेत. स्वातंत्र्य कधी बंधनरहित स्वातंत्र्य असू शकत नाही. अन्यथा, त्याचे अराजकात रूपांतर होते. घटनेने आणि त्यानुषंगाने कायद्याने बंधनाचे (Reasonable) स्वरूप स्पष्ट केले आहे. स्वातंत्र्याचा खरा उपभोग घेता यावा यासाठी शिक्षणाची परिस्थिती सुधारली पाहिजे आणि दारिद्र्याचे निर्मूलन व्हावयास हवे. याबाबत भारताची परिस्थिती समाधानकारक नाही हे लेखकाने समर्पकपणे मांडले आहे.

स्वातंत्र्याच्या संदर्भात शासनाची बंधने, धर्मसत्तेची बंधने आणि झुंडशाहीची दहशत अशा तिन्हींचा सामना करावा लागतो. धर्मसत्तेने अगर झुंडशाहीने स्वातंत्र्यावर दडपण आणले तर त्याविरुद्ध न्यायालयीन हस्तक्षेपाचा उपयोग फार मर्यादित असतो. दुर्दैवाने समाजजागृती आणि स्वातंत्र्यानुकूल मानसिकता आपण निर्माण करू शकलो नाही.

शासनाच्या दडपणापेक्षा हल्लीच्या काळात धार्मिक मूलतत्त्ववाद्यांकडून राजकीय फायद्यासाठी जातीय झुंडशाहीचा, धार्मिक झुंडशाहीचा फार मोठ्या प्रमाणावर वापर होत आहे. ही झुंडशाही व्यक्तिस्वातंत्र्याची सर्वांत मोठी शत्रू बनली आहे. महंमद अलवी, सलमान रश्दी, तस्लिमा नसरीन, प्रा. प्यारासिंग, लेखक शिवप्रकाश, शिवराम कारंथ अशी अनेक उदाहरणे लेखकाने दिली आहेत.

१९७५ च्या आणीबाणीच्या युगातील स्वातंत्र्याच्या संकोचासंबंधी लेखकाने विस्तृत विवेचन सादर केले आहे. अलीकडच्या काळात प्रत्यक्ष आणीबाणी न आणता 'पोटा'सारखे कायदे व्यक्तिस्वातंत्र्याचा संकोच कसा करतात याची उदाहरणे देणे संयुक्तिक ठरले असते.

पाचव्या 'समता' या प्रकरणात भारतातील अनेकपदरी विषमता– राजकीय, आर्थिक, सामाजिक, धार्मिक, स्त्रीपुरुष भेदविषयक– उल्लेखिलेली आहे. ही विषमता दूर करण्यासाठी घटनेतील तरतुदी– कलम १४ ते १८ –कितपत सार्थ ठरल्या याचे विवेचन आहे.

समतेच्या चर्चेच्या संदर्भात राखीव जागा, त्यांचा अनुशेष, क्रीमी लेअर, इत्यादींची चर्चा करताना लेखक म्हणतात :

राखीव जागा हा शांतपणे विचार करण्याचा, एक घटनात्मक बाजू असलेला सामाजिक प्रश्न न राहता एकमेकांवर हल्ला करण्यास उपयुक्त असा राजकीय प्रश्न बनला आहे,



अनुक्रमणिका

समाजाच्या सर्व वर्गांना विश्वासात घेऊन चर्चा अशक्य झाली आहे. राखीव जागांची आवश्यकता आज तरी कोणी नाकारू शकणार नाही, परंतु एवढ्यानेच मागासवर्गीयांचे सर्व प्रश्न सुटतील असे नाही.

मागासलेल्या वर्गात स्त्रिया हा सर्वांत मोठा वर्ग आहे. लोकसंख्येत या वर्गाचे प्रमाण जवळजवळ निम्मे (२००१ साली १००० पुरुषांमागे ९३३ स्त्रिया) असूनही राजकारणात त्यांचे प्रमाण १९९८ साली ८-८ इतके राहिले. "संसदेत आणि राज्य विधिमंडळात स्त्रियांना आरक्षण देण्याची तरतूद करणारे घटनादुरुस्ती विधेयक वेगवेगळी कारणे सांगून मंजूर न होऊ देण्यात पुरोगामित्वाचा आव आणणारे राजकीय पक्षही अडथळे निर्माण करीत आहेत."

सहावे प्रकरण 'धर्मनिरपेक्षते'संबंधी आहे.

या प्रकरणात धर्मनिरपेक्षतेचा तात्त्विक विचार, भारतीय राज्यघटनेतील तत्संबंधी तरतुदी आणि प्रत्यक्ष व्यवहार यांचे विवेचन आहे; न्यायालयांपुढे आलेल्या महत्त्वाच्या दाव्यांचा परामर्श आहे.

ज्यांचा धर्माशी अर्थाअर्थी संबंध नाही अशा धर्मातीत गोष्टींचे नियमन सरकार करीत असताना धार्मिक स्वातंत्र्याचा संकोच होतो असे अनेकदा आक्षेप घेतले गेले त्या वेळी न्यायालयांनी संबंधित धर्मांच्या व्यक्तींच्या आचरणावर अन्याय होणार नाही अशी समन्वयवादी भूमिका घेतलेली आढळते.

शाहबानोचा खटला (महंमद अहमद खान वि. शाहबानो) हा भारतातील धर्मनिरपेक्षते-समोरच्या विविध अडचणी स्पष्ट करणारे उदाहरण आहे. सर्वोच्च न्यायालयाचा मूळ निकाल– घटस्फोटित पत्नीला पोटगीचा हक्क आहे– मुस्लिम परंपरावाद्यांना मान्य नव्हता, तर काही मुस्लिम आणि बरेच उदारमतवादी गट निर्णयाचे स्वागत करीत होते. तत्कालीन न्यायमूर्ती चंद्रचूड यांना कुराणाचा अर्थ लावण्याचा अधिकार नाही असा आक्षेपही मुस्लिम धर्ममार्तंडांनी घेतला व शरीयतसंबंधी स्वतंत्र न्यायालयांची मागणी केली. (राजीव गांधी यांच्यासारख्या उदारमतवादी पंतप्रधानांनीसुद्धा नंतर वरील निर्णयाला बगल देणारा, मुस्लिमांना खूष करणारा अध्यादेश काढला हे लक्षात घेण्यासारखे आहे.)

भारताच्या राज्यघटनेच्या चवथ्या 'मार्गदर्शक तत्त्वे' या भागात 'समान नागरी कायदा' (कलम ४४) करावा असे तत्त्व उल्लेखिले आहे. प्रत्यक्षात मात्र, आजपर्यंत असा कायदा करण्यास कोणताही पक्ष धजावला नाही. (अगदी अलीकडे एप्रिल १०, २००३ रोजी या संबंधित प्रस्तावित विधेयक (खाजगी) मागे घेण्यात आले.)

ख्यातनाम घटनातज्ज्ञ एच. एम. सिखाई यांच्या मते "समान नागरी कायदा हे मृगजळ आहे." न्या. चपळगावकरांनी या मताशी 'विनम्र मतभेद' व्यक्त केला आहे. ते म्हणतात,

"विवाहविधी प्रत्येक धर्मात वेगवेगळे असू शकतात. परंतु माणुसकीचे नियम आणि सभ्यतेच्या जबाबदाऱ्या सर्वांनाच लागू असण्यास हरकत नाही."

दाऊदी बोहरा समाजाचे धर्मगुरू सरदार सैदना ताहेर वि. मुसाजी कोईचा या वादात धर्मगुरूंना समाजातील व्यक्तीला बहिष्कृत करण्याचा अधिकार आहे असा सर्वोच्च न्यायालयाने निर्णय दिला. हा निर्णय प्रतिगामी आहे, कारण "सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायमूर्तींबाबत आदर व्यक्त करूनही असे म्हटले पाहिजे की, धर्मस्वातंत्र्याच्या नावाखाली सामाजिक बहिष्कारासारखे अमानवी प्रकारही घटनात्मकदृष्ट्या वैध ठरतील का याचा पुनर्विचार केला पाहिजे... मूलभूत मानवी मूल्यांपेक्षा श्रेष्ठ असे दुसरे काहीही नाही. ही मूल्येच धर्मनिरपेक्ष नीतिव्यवस्थेचा आधार असतात.

धार्मिक दंगलीचे प्रमाण अलीकडे पुन्हा वाढू लागले आहे. दुर्दैवाने सर्व धर्मीयांना एकाच सामाजिक प्रवाहामध्ये आणण्यात आपल्याला यश मिळाले नाही. सर्वधर्मीयात उदारमतवादाला ओहोटी लागून कट्टरतेकडे वाटचाल चालू आहे. कोणत्या गोष्टींचा निषेध करावयाचा याचेही राजकीय हिशेब केले जातात. धर्मनिरपेक्ष शक्ती दुर्बल होत जाणे हे भारताच्या भवितव्याच्या दृष्टीने धोक्याचे आहे ही ग्रंथकाराची सूचना बरेच काही सांगून जाते.

भारतीय राज्यघटना, तिचा व्यवहार, पक्षीय राजकारण इत्यादी विषयांवर प्रतिवर्षी अनेक पुस्तके प्रकाशित होतात. राज्यघटनेसंबंधी काही पुस्तकांची प्रतिवर्षी नवीन अद्यावत आवृत्ती प्रसिद्ध होते (उदा. डी. डी. बसू). न्या. चपळगावकर यांच्या पुस्तकाचे वैशिष्ट्य म्हणजे भारतीय राज्यघटनेची वाटचाल त्यांनी केवळ पावणेदोनशे पृष्ठांत मांडली आहे. मूळ घटनाच मुळी चारशेच्या जवळपास पृष्ठांची आहे (३९८ कलमे आठ परिशिष्टे) घटनेतील सर्वांत महत्त्वाच्या मूल्यरचनेवर पुस्तक आधारले आहे. स्वत: न्यायमूर्ती असल्याने निवडक निवाड्यांचा संदर्भ आहे. परंतु निवेदन कोठेही किचकट अथवा शब्दजंजाळ झालेले नाही. निवेदन साधे, सरळ, सामान्य वाचकालाही सहज समजेल अशा ओघवत्या भाषेत आहे. सामाजिक उदारमतवाद जागोजागी जाणवतो. कोठेही कटु टीका नाही, परंतु निश्चित सूचक मते व्यक्त केली आहेत. समर्पक मुखपृष्ठ असलेले हे "मौज" प्रकाशन आपला नेहमीचा बाज राखून आहे.

पुस्तक पारितोषिकास पात्र आहे.

**डॉ. वि. मा. बाचल**
'पंढरी' क्षिप्रा सहनिवास,
कर्वेनगर, पुणे ४११०५२.

■

---

## स्वागत

**यशवंतराव चव्हाण,** सा. सूची, संपा. वि. वि. पाटील, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, १८८
**गंध बावरी,** डॉ. विजया संगवई, स्नेहवर्धन प्रकाशन,, पुणे, ८०
**सयाजीराव गायकवाड,** गणेश अग्निहोत्री, शिव पब्लिकेशन, पुणे, ३६



अनुक्रमणिका

## संशोधन सुमने-गुच्छ दुसरा
## विचार व विवेकयुक्त संशोधनाचा नमुना

*(संशोधन सुमने- गुच्छ दुसरा : लेखक - प्रा. श्री. मा कुलकर्णी; प्रकाशक- विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर; पृष्ठे - १२ + २०२; मूल्य १५० रुपये)*

**द. दि. पुंडे**

प्रा. श्री. मा. कुलकर्णी हे नाव मराठी समीक्षा व संशोधनाच्या क्षेत्रात सर्वदूर सुपरिचित आहे. त्यांचे 'कादंबरी समीक्षा', 'संशोधन सुमने-गुच्छ पहिला', 'संतसाहित्य सेवन' इत्यादी ग्रंथ अभ्यासकांनी संदर्भमूल्य असणारे ग्रंथ म्हणून स्वीकारले आणि उपयोजिलेही आहेत. प्रा. कुलकर्णी यांचा अगदी अलीकडे प्रकाशित झालेला 'भक्त मयुराच्या केका' हा टीकाग्रंथ त्यांची विद्वत्ता, त्यांचा व्यासंग आणि मध्ययुगीन वाङ्मयाकडे पाहण्याची त्यांची सहृदय रसिकाची दृष्टी यांचे प्रत्यंतर देणारा आहे. त्यांची श्रीराम, श्रीकृष्ण, भीष्म, युधिष्ठिर इत्यादींची चरित्रे रेखाटणारी ग्रंथसंपदा त्यांचा विवेचक अभ्यास व सश्रद्ध रसिकता यांचे मनोज्ञ दर्शन घडविणारी अशीच आहे. त्यांचे प्रबंधरूप निबंधरूप, संशोधन-समीक्षापर असे आणखी लेखन ग्रंथस्वरूपात आणि स्फुटलेखांच्या रूपात अभ्यासकांसमोर आहेच. व्यासंगाची अशी समृद्ध पार्श्वभूमी असणाऱ्या प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांचा 'संशोधन सुमने' - गुच्छ दुसरा' हा ग्रंथ विदर्भ संशोधन मंडळाने नुकताच (जुलै २००२) प्रसिद्ध केला आहे.

प्रा. कुलकर्णी यांच्या या शोधलेखसंग्रहाचे एक वैशिष्ट्य सर्वप्रथम अधोरेखित करून नमूद करावेसे वाटते. ते असे की मराठीत अलीकडे जे संशोधनपर लेखन होते आहे ते प्रामुख्याने विद्याक्षेत्रीय (Academic) असे असते. प्रा. कुलकर्णी यांचे संशोधनपर लेखन असे केवल विद्याक्षेत्रीय असत नाही; ते धर्मसंस्कृतीच्या अंगानेही जाणारे असते. त्यामुळेच ते हेतुगर्भ असते आणि त्यात विद्वत्तेपेक्षा मूल्यशोधन महत्त्व धरण करताना दिसते. उदाहरणार्थ, या शोधलेखसंग्रहातील पहिलाच लेख पाहावा. 'महाभारता'ची तीन संस्करणे झालेली आहेत आणि 'महाभारता'चे कर्तृत्व एकट्या व्यास महर्षींचे नाही; ते व्यास, वैशंपायन व सौति अशा तीन जणांचे आहे, या भारताचार्य वैद्य प्रभृतींच्या मताची प्रा. श्री. मा. कुलकर्णी अत्यंत बारकाईने व तपशिलाने चिकित्सा करतात आणि ते मत साधार खोडतात. त्यानंतर आपले विचार मांडताना ते म्हणतात, "तीन संहितांची ही कल्पना मुळात अविश्वासातून निघाली आहे आणि तर्क व अनुमान यांवर पोसली गेली आहे. एका व्यक्तीने एवढी प्रचंड रचना करणे कसे शक्य आहे, या संशयातून या मताचा उगम झाला आहे..... मुळात हा संशय पाश्चात्त्य अभ्यासकांना आला..... त्यांच्याकडच्या मोठ्यातल्या मोठ्या महाकाव्यापेक्षा दसपट मोठा हा ग्रंथ एका कवीने रचला हे त्यांना समजणेच शक्य नाही. त्यांचे मत मुळीच चिकित्सा न करता भारतीय विद्वानांनी स्वीकारावे हे आश्चर्य आहे. विशालबुद्धी व्यासांना हे

शक्य नाही असे मानणाऱ्या विद्वानांनी मूळाच्या तीन चतुर्थांश ग्रंथ व्यासांच्या प्रशिष्यास शक्य झाला हे मान्य करावे (हे भारताचार्य वैद्य मानतात-परीक्षणलेखक) हे आणखीनच आश्चर्यकारक आहे.'' (पृ. २५) हा आपला विचार मांडताना प्रा. कुलकर्णी भारतात पूर्वापार उपलब्ध असणाऱ्या मौखिक परंपरेकडे अंगुलिनिर्देश करून महाभारत मुखोद्गत करून ते श्रोत्यांना ऐकविण्याची प्रथा असावी असे म्हणतात. वैशंपायनापासून ही परंपरा असावी असेही प्रा. कुलकर्णी यांचे प्रतिपादन आहे. मौखिक परंपरेत संहितांची श्लोकसंख्या कमीजास्त होत जाण्याचा प्रकार असल्याने महाभारत संहिता रचण्याचे कर्तृत्व एकट्या व्यासांकडेच जाते, असा प्रा. कुलकर्णी यांचा येथील दावा आहे.

'महाभारताची तीन संस्करणे : तीन कर्ते - एक चिकित्सा' या पहिल्या लेखातील प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांच्या विचारांची परिपूर्ती 'महाभारताची संस्करणे : पुनरीक्षण' या परिशिष्ट - लेखात होते. प्रा. कुलकर्णी यांच्या लेखाचे खंडन करणारा जो लेख डॉ. नी. र. वऱ्हाडपांडे यांनी विदर्भ संशोधन मंडळाच्या १९९६ च्या 'वार्षिका'त लिहिला होता, त्याला दिलेले उत्तर म्हणजे हा परिशिष्ट-लेख होय. यात प्रा. कुलकर्णी यांनी उपस्थित केलेले प्रश्न महत्त्वाचे आहेत. ते लिहितात, ''वेगवेगळ्या संहिता वेगवेगळ्या काळी सिद्ध झाल्या, की महाभारतात सतत भर पडत गेली? सतत भर पडत गेली तर ही भर घालणारे किती व कोण...... याला प्रक्षेप म्हणायचे की वेगळी संहिता म्हणायचे? या अशा प्रश्नांची उत्तरे निश्चित केली पाहिजेत व दिली पाहिजेत...'' (पृ. २०२) प्रा. कुलकर्णी यांनी उपस्थित केलेले प्रश्न केवळ डॉ. वऱ्हाडपांडे यांना पेचात टाकणारे नाहीत, तर ते महाभारत -संहिता-संशोधनासंदर्भातले मूलभूत प्रश्न आहेत. नीट पाहिले तर आपल्या असे लक्षात येते की हे प्रश्न केवळ महाभारत संहितेच्याच नव्हे, तर प्राचीन वा मध्ययुगीन अशी कोणत्याही संस्कृत, प्राकृत वा मराठी संहितेच्या निश्चितीच्या संदर्भात देखील मूलभूत ठरणारे प्रश्न आहेत. किंबहुना संशोधनविद्येतील हे तत्त्वशोधनाचे प्रश्न आहेत.

महाभारत हा ग्रंथ असंख्य व्यक्तींचा एक महापटच आहे. या महापटाचा कोड्यात टाकणारा भाग म्हणजे या व्यक्तींची वये किंवा आयुष्यकाल. महाभारतात एकच व्यक्तीचे निरनिराळ्या घटनाप्रसंगात निरनिराळ्या व्यक्तींशी संबंध येतात आणि तेथील प्रमाणे, अनुमाने वा निर्देश लक्षात घेता एकाच व्यक्तीच्या आयुष्यकालाचे गणित निरनिराळे ठरते. पुन्हा यात 'भागवता'सारख्या ग्रंथातील वेगळ्या निर्देशांची भर पडून वयांबाबतचा गोंधळ वाढत जातो. या गोंधळातून वाट कशी काढायची हा प्रश्न महाभारताच्या अभ्यासकांसमोर सततच असतो. (महाभारत-कथा कवेत घेण्याचा प्रयत्न करणारी 'पर्व' नामक आपली कादंबरी लिहिताना त्या मूळ कन्नड कादंबरीचे लेखक डॉ. एस. एल. भैरप्पा यांनाही हा प्रश्न पडला होताच.) प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांनी 'भगवान श्रीकृष्णांचा अवतार कार्यकाल' या लेखात या प्रश्नाचे तर्कबुद्धीला पटेल असे उत्तर शोधले आहे. त्यासाठी त्यांनी प्रत्यक्ष महाभारत ग्रंथातीलच अंत:प्रमाण स्वीकारले आहे, हे महत्त्वाचे. वयाच्या ज्येष्ठते-समते-कनिष्ठतेनुसार समोर

आलेल्या व्यक्तीला अभिवादन करण्याच्या ज्या रीती महाभारत कालात आणि खुद्द महाभारत संहितेत उपलब्ध होतात, त्या लक्षात घेऊन प्रा. कुलकर्णी यांनी भीष्म, युधिष्ठिर, दुर्योधन, श्रीकृष्ण व अर्जुन यांचा सर्वप्रथम ज्येष्ठताक्रम ठरविला आणि मग विविध प्रमाणांचा आश्रय घेऊन श्रीकृष्णाचा आयुष्यकाल 'भागवता'त नमूद केल्याप्रमाणे १२५ वर्षांचा नसून तो १०० वर्षांचा -'शरद: शतम्' एवढा असल्याचे ठरविले आहे. संशोधकाने आपल्यासमोरील प्रश्न सोडविण्यासाठी विचाराधीन कालखंडातील लोकाचार किंवा जीवनशैली यांचाही अभ्यास करणे गरजेचे आहे, असाच या लेखाचा इत्यर्थ काढता येतो.

'द्यूतपर्व-एक चिकित्सा : द्रौपदीचा अनुत्तरित प्रश्न' हा या संग्रहातील महाभारतविषयक आणखी एक लेख. स्वत:ला द्यूतात हरवून घेतल्यानंतर युधिष्ठिराला द्रौपदी पणास लावण्याचा अधिकार उरतो काय, हा एक प्रश्न आहे. आणि युधिष्ठिराने स्वत: द्रौपदीस पणास लावले नव्हते, तर शकुनीने त्याला तसे करण्यास उद्युक्त केले होते; तेव्हा हे कपटजाल नाही काय, हा दुसरा प्रश्न आहे. याबाबतीत विदुर आणि विकर्ण यांनी फक्त आपली स्पष्ट मते नोंदविली होती. "मी जिंकले गेले आहे, की नाही?" हा द्रौपदीचा प्रश्न संपूर्ण सभा मूक राहिल्याने अनुत्तरित राहिला होता. महाभारतातील या सर्व प्रसंगांची प्रा. श्री. मा. कुलकर्णी सविस्तर, साधार चर्चाचिकित्सा करतात आणि वाचकांच्या चिंतनासाठी-

(१) पतीचा पत्नीवरील स्वामित्वाचा अधिकार कोणत्या तरी परिस्थितीत संपतो की नाही? आणि

(२) कपटाने झालेला व्यवहार अग्राह्य केव्हा व कसा ठरतो?

हे दोन प्रश्न ठेवतात. यांतील पहिला प्रश्न विवाहसंस्काराशी निगडित आहे, तर दुसरा व्यवहार-अध्यायाशी, हे सूचित करून या दोन्ही प्रश्नांमधील कूटत्व प्रा. कुलकर्णी वाचकांच्या लक्षात आणून देतात. दुसऱ्या प्रश्नाच्या बाबतीत "आजच्याही विधीला विचारात घेऊन विधिज्ञांनी ठरविले पाहिजे" असे जेव्हा प्रा. कुलकर्णी लेखाच्या अखेरीअखेरीस म्हणतात, तेव्हा ते महाभारतकालीन समस्येची परीक्षा वर्तमानाच्या संदर्भात करण्याची आवश्यकताच नमूद करतात, असे वाटते. (प्रा. कुलकर्णी यांनी जराही सूचित केलेले नसले तरी त्यांनी उपस्थित केलेले वरील दोन्ही प्रश्न सध्या विस्कटण्याच्या अवस्थेत असलेल्या भारतीय वैवाहिक जीवनासंदर्भात महत्त्वाचेच ठरतात, हे जाता जाता नमूद करायलाच हवे.)

'श्रीकृष्ण-अर्जुन संवाद' या लेखाचे प्रयोजन ज्ञानेश्वरीचे यथार्थ आकलन व्हावे, हे आहे. ज्ञानेश्वरीमध्ये ज्ञानदेवांनी स्वप्रज्ञाप्रतिभेनिशी रंगविलेल्या कृष्णार्जुन- संवादाचा आस्वाद अधिक जाणकारीने घेण्यासाठी प्रा. श्री. मा. कुलकर्णी या लेखात श्रीकृष्ण व अर्जुन यांचे संबंध महाभारतकथेतील काही निवडक प्रसंगांच्या आधारे स्पष्ट करून सांगू इच्छितात. कारण "ज्ञानदेवांनी कृष्णार्जुनांचे संवाद रचताना संपूर्ण महाभारत विचारात घेतले आहे" असे प्रा. कुलकर्णी यांचे अभ्यासान्ती बनलेले ठाम मत आहे. (पृ. ११९) 'ज्ञानेश्वरी'च्या रचनेमागे महर्षी व्यास निवेदित श्रीमद्भगवद्गीता आहे, असे तर प्रा. कुलकर्णी निश्चयाने मानतातच, पण

त्याचबरोबर ज्ञानेश्वरी-रचनेला समग्र महाभारत ग्रंथाची पार्श्वभूमी आहे, असेही ते सप्रमाण मानतात. या त्यांच्या अभ्यासिद्ध मतातच 'ज्ञानेश्वरी वाक्प्रचार, म्हणी इत्यादी' (लेख क्र. ८) आणि 'ज्ञानेश्वरी आणि गीता' (लेख क्र. ९) या लेखांचे उगम सापडतात. प्रा. म. वा. धोंड यांनी 'ज्ञानेश्वरी : स्वरूप, तत्त्वज्ञान आणि काव्य' या आपल्या ग्रंथात अशा प्रकारची भूमिका घेतली आहे की ज्ञानेश्वरीची रचना करताना ज्ञानेश्वरांपुढे व्यासकृत गीता नाही; ज्ञानेश्वरी वाचताना त्या श्लोकांचा व्यत्यय येतो; म्हणून ''ते श्लोक टाळून किंवा गाळून ज्ञानेश्वरी वाचावी.'' प्रा. धोंडाच्या या मताचा प्रतिवाद करण्यासाठी प्रा. कुलकर्णी यांनी येथील 'ज्ञानेश्वरी आणि गीता' हा लेख सिद्ध केलेला आहे. अर्थातच आपले मत साधार, सप्रमाण, सयुक्तिक मांडून प्रा. कुलकर्णी यांनी प्रा. धोंडांचे निष्कर्ष ''न्याय्य वाटत नाहीत'' असा निर्णय दिला आहे; आणि तो देताना प्रा. धोंडांची गफलत कुठे व कशी झाली आहे, हेही दिग्दर्शित केले आहे. याअगोदरचा लेख, म्हणजे 'ज्ञानेश्वरीतील वाक्प्रचार, म्हणी इत्यादी' हा लेखदेखील प्रा. धोंड यांच्यासारख्यांना किंवा ज्ञानेश्वरी गीत ग्रंथाशी संबंधित नसून ती एक स्वतंत्र रचना आहे असे म्हणणाऱ्यांना एक सरळ परस्पर उत्तरच आहे. कारण या लेखाद्वारे ज्ञानेश्वरीत आलेले वाक्प्रचार, म्हणी, सुभाषिते व न्याय यांची पाहाणी व चर्चा करताना प्रा. कुलकर्णी यांनी पुन:पुन्हा महाभारतातील छोट्यामोठ्या कथाप्रसंगांशी असलेले त्यांचे अनुसंधानच दाखविलेले आहे. या लेखाला जोडलेले 'परिशिष्ट' प्रस्तुत परीक्षणलेखकाला एका वेगळ्याच कारणासाठी महत्त्वाचे वाटते. प्रा. श्री. मा. कुलकर्णी एखाद्या विषयाचा कसा सर्वांगीण अभ्यास करतात, पण तो मांडताना ते संक्षेपाचा साक्षेपही साकल्याने कसा सांभाळतात हे येथे कळते. आपल्या शोधनिबंधातच तपशिलाने, यांत्रिकपणे समग्र याद्या देऊन आपल्या शोध-लेखाची लांबीरुंदी वाढविणाऱ्या व त्याद्वारे आपल्या विद्वत्तेचे प्रदर्शन करू पाहणाऱ्या अभ्यासकांसाठी हा लेख म्हणजे शोधलेखनपद्धतीचा एक आदर्शच ठरावा.

१९९९ मध्ये कारगिल युद्धात भारतीय जवानांनी अतुलनीय क्षात्रतेज दाखवून अवघ्या जगाला स्तिमित केले. या घटनेने प्रेरित होऊन प्रा. कुलकर्णी यांनी भारतीय क्षात्रतेजाची परंपरा व त्यातील सातत्य दिग्दर्शित करण्याच्या हेतूने 'गीतोक्त क्षात्रधर्म' हा लेख लिहिला हे स्पष्टच आहे. त्यांच्या मते 'भारतीय 'क्षत्रिय' हा जगात आगळावेगळा असा मानव आहे..... त्याची जडणघडण अशी काही केलेली आहे, झालेली आहे की जगात कुठेही शौर्यातच नव्हे, तर मानवतेतही त्याची बरोबरी करणारा कोणी लढवय्या, योद्धा वा सैनिक आढळणार नाही.'' (पृ. १२८). प्रा. कुलकर्णी यांच्या मते भारतीय क्षत्रियाच्या या विशेषतेचा निर्देश गीतेच्या १८ व्या अध्यायातील ४३ व्या श्लोकात केलेला असून त्याचेच विवरण ज्ञानेश्वरांनीही मोठ्या आत्मीयतेने केले आहे. तेथे शौर्य, तेज, धैर्य, दक्षता व अपलायनम् (याला आपण स्थैर्य म्हणू शकू) हे गुणविशेष आणि दान व ईश्वरभाव हे कर्मविशेष नमूद केलेले आहेत. गीतोक्त क्षात्रतेज या गुणकर्मांनी युक्त आहे व तेच भारतीय योद्धा आजवर बाळगून आहे, असे प्रा. कुलकर्णी यांचे येथील एकूण प्रतिपादन आहे. हा लेखही भारतीय

संस्कृतीतील मूल्यांचाच शोध घेणारा आहे, हे वेगळे सांगायला नकोच.

या शोधलेखसंग्रहातील 'मराठी संस्कृती : काही प्रश्न' (लेख क्र. ४) आणि 'डॉ. मिराशी यांच्या संशोधनाच्या प्रकाशात प्राचीन महाराष्ट्र' (लेख क्र. ५) हे दोन्ही लेख म. म. डॉ. वा. वि. मिराशी यांच्या महाराष्ट्र (प्रदेश) आणि महाराष्ट्री (भाषा) यांविषयींच्या विविध ठिकाणच्या शोधकार्याचा वेध घेणारे लेख आहेत. वास्तविक हे दोन्ही लेख डॉ. मिराशी यांच्या पुण्यस्मृतीला वंदन करणारे आहेत (आणि म्हणूनच त्यात काही प्रमाणात पुनरुक्तीही झालेली आहे). पण या लेखांची विशेषता अशी की यांमध्ये डॉ. मिराशी यांचा गुणगौरव किंवा त्यांच्या शोधकार्याचा उदोउदो करण्यापेक्षा डॉ. मिराशींची शोधक प्रज्ञाप्रतिमा व त्यांचे मौलिक शोधसिद्धान्त यांचे महत्त्वमापन करण्यावर प्रा. कुलकर्णींनी भर दिलेला आहे. प्रा. कुलकर्णी यांचा हेतू असा केवल-गौरवाचा नसल्यामुळे' 'पहिला मराठी लेख कोणता?' या प्रश्नाबाबतचे मिराशींचे मत अग्राह्य व डॉ. तुळपुळे यांचे ग्राह्य, असे ते सरळपणे म्हणू शकतात. (पृ. ८०). येथेही प्रा. कुलकर्णी परत मूल्यशोधनालाच महत्त्व देतात; व्यक्तिगौरवाला नव्हे.

प्रा. पां. कृ. सावळापूरकर हे मराठी व संस्कृत वाङ्मयाचे जुने व जाणते संशोधक-अभ्यासक. या संग्रहातील शेवटच्या लेखात प्रा. कुलकर्णी यांनी त्यांच्या कार्याचा 'एक धावता आढावा' घेतलेला आहे. हा आढावा घेतानाही प्रा. सावळापूरकरांच्या लेखनातील सत्वच वाचकांपुढे ठेवण्याचा प्रयत्न प्रा. कुलकर्णी सतत करताना दिसतात. पुराणग्रंथातून अवतरणाऱ्या महर्षी नारदांसारख्या व्यक्तींची चरित्रे रचणे हे दुष्कर आहे हे सांगताना प्रा. सावळापूरकरांनी उपस्थित केलेल्या "प्राकृत चरित्र-नायकाने निर्माण वा प्रचलित केलेले ज्ञान हेच महत्त्वाचे नव्हे काय?" (पृ. १८३) या प्रश्नाकडे प्रा. कुलकर्णी वाचकांचे हेतुत: लक्ष वेधतात. स्वत: प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांनी श्रीराम, श्रीकृष्ण इत्यादी पुराण पुरुषांची चरित्रे लिहिलेली असल्याने प्रा. सावळापूरकरांच्या या मौलिक प्रश्नाकडे त्यांचे स्वत:चे लक्ष गेले असणार हे उघडच आहे. त्यामुळे एक प्रकारे प्रा. कुलकर्णी पुराण ग्रंथातील ग्राह्य काय याबद्दल प्रा. सावळापूरकरांचा हवाला देऊन वाचकांना अप्रत्यक्षपणे बोधितच करतात, असेही वाटून जाते. प्रा. सावळापूरकरांनी संपादित केलेल्या ज्ञानेश्वरीच्या एका बीड-प्रतीचा परिचय करून देतानाही मराठी वाङ्मयाच्या संशोधकांना सावळापूरकरांनी दिलेल्या कडक इशाऱ्याचा प्रा. कुलकर्णी यांनी जाणूनबुजून निर्देश केलेला दिसतो. तो इशारा असा आहे की 'लेखकाच्या (म्हणजे पोथ्या किंवा बाडे उतरवून काढणाऱ्याच्या) अज्ञानामुळे जे अशुद्ध पाठ तो लिहितो त्याची पाठभेद म्हणून प्रतिष्ठा करणे व त्यावरून भाषाशास्त्रीय व अन्य अनुमाने काढणे फार धोक्याचे आहे." (पृ. १८८). एका रीतीने पाठसंशोधन हे अधिकाधिक यांत्रिक व अधिकाधिक विद्याशाखीय (ॲकडेमिक) होत जाण्यातला धोकाच येथे प्रा. सावळापूरकरांनी अधोरेखित करून सांगितलेला आहे आणि प्रा. कुलकर्णी यांनी तो अचूकपणे वाचकांच्या निदर्शनास आणलेला आहे.

हा लेखसंग्रह म्हणजे विचार व विवेकयुक्त संशोधनाचा एक सुरेख नमुनाच होय. या शोधलेखसंग्रहातील कोणताही एक लेख स्वतंत्रपणे पाहिला तरी प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांच्या मूल्यशोधक प्रज्ञाप्रतिभेचा सहजस्पर्श वाचकमनाला होतो आणि वाचक विचारसन्मुख होतो. वाचकाला नवी क्षितिजे दाखवून विचारसन्मुख करणे हाच अखेरत: कोणत्याही शोधलेखसंग्रहाचा मूलभूत हेतू असतो. त्या दृष्टीने पाहाता प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांचा 'संशोधन सुमने-गुच्छ दुसरा' हा ग्रंथ सफळ-सुफल झाला आहे, असे निश्चयाने म्हणता येते.

**द. दि. पुंडे**
४/९ अर्चनानगर, एरंडवन, पुणे ४११०३८

■

## समाजाला - लेखकांना मूल्यांच्या बाजूने उभे करणारा 'युगसंवाद'

*'युवसंवाद' लेखक : डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी प्रकाशक : नवीन इंदलकर नवीन उद्योग प्रकाशन ५७७, बुधवार पेठ, नाना हौदाजवळ, पुणे ४११००२ पृष्ठ ९२ किंमत ९० रुपये*

**डॉ. वि. स. जोग**

डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी हे नागविदर्भातील उपयुक्त वाङ्मयीन व्यक्तित्व. त्यांनी विदर्भात पथकविता उभी केली. पथनाट्याची सुरुवात केली. लोकप्रिय राजकीय वात्रटिका नव्हे, तर धारदार राजकीय- सामाचिक उपहासिका लिहिल्या. कवितेच्या माध्यमातून ते जनतेशी संवाद साधतात. समाजजीवनातील विसंवाद उघडे करतात. कवितेतून ते बोलतात तेव्हा अत्यंत सहज, सुबोध संपादक असतात. मराठीतले ते महत्त्वाचे कवी आहेत.

संपादक म्हणूनही त्यांची कामगिरी महत्त्वाची आहे, रविवारची पुरवणी त्यांनी भारदस्त केली. ग्रामीण भागातील उदयोन्मुख लेखकवर्ग आणि शहरातला ख्यातनाम प्रतिभावंत विचारवंत अशा दोन्ही घटकांना आपली वाटणारी, महाराष्ट्रातील समस्त मराठी वाचकांना हवीहवीशी वाटणारी, पुरवणी देऊन त्यांनी एक ऐतिहासिक कार्य केले.

डॉ. श्रीपाद जोशी यांचा विदर्भ साहित्य संघाशी अखंड पंचवीस वर्षं संबंध आहे, एक जाग़रूक कार्यकारिणी सदस्य, एक महत्त्वाकांक्षी पदाधिकारी, केवळ मराठीच नव्हे, तर सर्वभाषिक रसिक आणि लेखक यांचा वाङ्मयीन उत्साह संघटित करून तो इष्टानुगामी करणारा संयोजक या दृष्टीने देखील त्यांचे योगदान मोठे आहे. विदर्भ साहित्य संघाच्या 'युगवाणी' नियतकालिकांचे त्यांनी सर्वाधिक काळ म्हणजे नऊ वर्षं संपादन केले. त्या काळातील बावीस संपादकीयांचे 'युगसंवाद' हे संकलन आहे.

रविवार पुरवणीचे संपादन आणि 'युगवाणी' सारख्या मासिकाचे (म्हणजे आजच्या काळातल्या वार्षिकाचे) संपादन यात फरक आहे. दैनिकाच्या संपादकांसमोर समग्र आणि संमिश्र वर्ग असतो, त्यामुळे ताज्या घटनांना, त्यावरील लेखनाला अग्रक्रम द्यावा लागतो. या

घटना कधी दीर्घकाळ टिकतात, कधी लगेचच विरतात.

मासिक, द्वैमासिक, त्रैमासिकांच्या संपादकापुढचं काम थोडं वेगळं असतं. एका अर्थानं ते सोपं असतं, दुसऱ्या अर्थानं ते बिकट असतं. सोपं या अर्थानं की त्यांना अष्टौप्रहर तत्पर तसंच सावध राहाण्याची गरज नसते, सोपं याही अर्थानं की त्यांना घटना सर्वांगांनी तपासण्यास सवड मिळते, घाईमुळे संभवणाऱ्या चुका त्यातून टळतात. पण बिकट या अर्थी की त्यांना जनतेसमोर प्रकटण्याची संधी इतक्या उशिरा मिळते की प्रबोधनाचा हेतू विफल होऊ शकतो. तरीही मराठीतील काही नियतकालिकांनी वैचारिक जागरण आणि वाङ्मयीन वातावरण निर्माण केले. व्यावसायिकांपैकी 'वसंत' च्या दत्तप्रसन्न काटदरे यांनी असे केले. 'वाङ्मय शोभा'च्या मनोहर महादेव केळकरांनी असे केले. दलाल, अंतरकर यांचीही नावं या संदर्भात देता येतील. 'सत्यकथा'ला तर टाळून चालणारच नाही.

पण संस्थांच्या नियतकालिकांचं या संबंधातलं योगदान निराशाजनक आहे. 'प्रतिष्ठान', 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका', साहित्य' यांपैकी त्यातल्या त्यात दीर्घकालीन दबदबा निर्माण केला 'प्रतिष्ठान'ने. त्यांच्या तुलनेत 'युगवाणी' सर्वार्थानं सरस होतं. श्रीपाद भालचंद्र जोशींच्या वाट्याला 'युगवाणी' चा संस्थात्मकदृष्ट्या एक शापित कालखंड आला. बहात्तर अंक निघायला हवे होते, ते चोवीसच निघाले, ते सुद्धा अनियमित.

'युगवाणी' ला 'संकुला' चा व्याप भोवला. पण अशा सबबी सांगून चालणार नाही. संकुल काळातील युगवाणीची उपेक्षा आणि अवमान रोखण्याचे प्रयत्न डॉ. जोशींनी केले असतीलच, नाही असे नाही. पण ते एकट्याचे प्रयत्न अपुरेच ठरणार.

या बावीस संपादकीयांपैकी लेखकांची आभार यादी देणारे एक दोन औपचारिक लेख सोडले तर अन्य सर्व लेखांतून दिसतं की 'युगवाणी'च्या माध्यमातून एक वाङ्मयीन संस्कृती जोपासण्याचा डॉ. जोशींचा प्रयत्न आहे. डॉ. जोशींचं संपादक व्यक्तिमत्त्व प्रस्तावनेत प्रा. रा. ग. जाधव यांनी सांगितल्याप्रमाणे "तांत्रिक व संवाद युगाच्या तज्ज्ञ प्रतिनिधीचं आहे, पण अंध अनुयायाचं नाही." या सर्वच संपादकीयातून जीवनविषयक, साहित्यविषयक आणि साहित्य चळवळीविषयक तळमळीचे विचार आहेत, हे विचार सोप्या भाषेत येऊ शकले असते. अमूर्त संकल्पन, चेतक, अंतर्विश्वातील संस्कार, गर्भार कालखंड, घटिताचे कर्ते, प्रतिभाव्यापारावरील आच्छादने इ. या पुस्तकातील अनेक अनावश्यक शब्दांसाठी सोपे पर्याय सहज उपलब्ध आहेत. मर्ढेकरोत्तर मराठी प्राध्यापकीय नवसमीक्षेने क्लिष्ट शैलीचे काही खोटे संकेत निर्माण केले. जे मराठी प्राध्यापक नाहीत अशा समीक्षकांनी संपादकांनी या संकेतांना आदर्श मानण्याची गफलत केली. तीच गफलत जोशींचीही झाली.

सभ्यतापूर्ण समाज म्हणजे संस्कृती, व्यक्ति-स्वातंत्र्याचा आदर म्हणजे संस्कृती. अभिरुचीसंपन्नता, मानवता आणि परिवर्तन म्हणजे संस्कृती. निकोप समाज हा संस्कृतीचा आधार असतो. स्वच्छ मेंदूची व्यक्ती ही निकोप समाजाचा कणा असते. अशी डॉ. जोशींची सर्वसाधारण भूमिका आहे. सामाजिक परिवर्तन हे बुद्धिवंतांकडून होत असते, त्यांनी अलिप्तपणा

सोडून समाजाचे नेतृत्व करावे हा डॉ. जोशींचा आग्रह आहे, तो समर्थनीय आहे. डॉ. जोशी सांगतात ''प्रत्यक्षात बुद्धिवंतांबद्दल समाजात काही भ्रम निर्माण झाले आहेत. बुद्धिवंत म्हणजे कोणीतरी 'उच्चवर्णीय' किंवा माणूसघाणा प्राणी', बुद्धिवंत म्हणजे केवळ लेखक, कलावंत, प्राध्यापक. बुद्धिवंत म्हणजे केवळ शहरी. ग्रामीण नसलेला, बुद्धिवंत म्हणजे श्रमाशी संबंध नसलेला प्राणी, बुद्धिवंत म्हणजे कोणत्याही गोष्टीचा कीस पाडणारा, कोणतेच काम न होऊ देणारा व म्हणून अडथळाच, वाद घालणारा, हिंमत नसणारा, एखाद्या बाबीतून स्वत: निसटून जाणारा इ.'' (पृ. २५) बुद्धिवंतांबद्दल हे जे समज-अपसमज समाजात निर्माण झाले आहेत ते डॉ. जोशींना निपटून काढायचे आहेत. स्वातंत्र्यपूर्व काळात समाजाचे नेतृत्व बुद्धिवंतांकडे होते. स्वातंत्र्योत्तर काळात हे नेतृत्व संपुष्टात आणण्याचे षडयंत्र रचले जात आहे याबद्दल लेखकाला खंत आहे. धनवंत आणि सत्तावंत हे नेतृत्व नष्ट करीत आहेत, त्यासाठी भावनात्मक आव्हानबाजी करीत आहेत हे रोकडे सत्य डॉ. जोशी सांगतात. लेखक-कलावंतांची बंडखोरी ही केवळ दंतकथा झाली आहे. ही वास्तविकता डॉ. जोशी अधोरेखांकित करतात. १९९० मध्ये व्यक्त केलेले हे विचार आज दहा वर्षांनंतर अधिकच खरे ठरत आहेत. एखाद्या विद्यापीठातील सर्वभक्षी भ्रष्टाचारापासून राष्ट्रीय शासकीय पातळीवरील आंतरराष्ट्रीय सौदेबाजीपर्यंत अशी शेकडो प्रकरणे आहेत की यासंबंधात आजचे बुद्धिवंत एकतर बधिर आहेत किंवा अलिप्त आहेत किंवा शाब्दिक निषेधाच्या औपचारिक कर्मकांडात समाधानी आहेत. आवश्यकता आहे ती बुद्धिवंतांनी निर्णायक संघर्षात उतरण्याची.

'युगसंवाद' संग्रहाचा संदेश संग्रहाचा आहे. लेखकांनी केवळ अभिव्यक्ती (या ठिकाणी तिचा अर्थ शैली, रचना असा आहे) चा संघर्ष करू नये. त्यांनी तत्त्वांसाठी संघर्ष करावा असे डॉ. जोशींचे सांगणे आहे. व्यक्तिस्वातंत्र्य हे त्यांनी महत्त्वाचे तत्त्व मानले, महत्त्वाचे मूल्य मानले, व्यक्तिस्वातंत्र्य मानले की लेखनस्वातंत्र्य मानावे लागते. लेखनस्वातंत्र्य मानले की सलमान रशदीविरोधी फतवा, लज्जाविरोधी फतवा, लीळा चरित्रावरील बंदी यांचा निषेध करावा लागतो. या जागरूक संपादकाने स्वत:च्या संपादकीयमधून असे निषेध केले, विवेक विरुद्ध भावना या द्वंद्वात स्वत:चा कौल विवेकवादाच्या बाजूने दिला. अती तार्किकता आणि अती तुच्छता (किंवा बेपर्वाई) या दोन्ही एकांगी प्रवृत्तींपासून दूर राहण्याची शिकवण दिली.

प्रत्येकी दीड-दोन पानाच्या या संपादकीयांमध्ये मुख्य भर आहे तो लेखकांना मूल्यांच्या बाजूने उभे करण्याचा. लेखक आपले 'स्थानमाहात्म्य' जपतात, आजच्या महत्त्वाच्या आव्हानांपासून पळतात असे डॉ. जोशींचे निरीक्षण आहे. संपादक म्हणून डॉ. जोशींना वाङ्मयीन वातावरण दिले ते पुढीलप्रमाणे : धनसंस्कृतीचा हव्यास, मूल्यव्यवस्थांचा क्षय, प्रच्छन्न भोगवादाचा उदय, माणूस ही (त्यात लेखकही आला) फक्त अर्थव्यवस्थेची साधनसामग्री, या प्रतिकूल वाङ्मयीन वातावरणाशी लेखकांनी संघर्ष करावा हे डॉ. जोशी संगातात.

पण संघर्षाचा नेमका मार्ग डॉ. जोशींनी सांगितला नाही. कारण 'युगवाणी'च्या मर्यादित व्यासपीठावरून त्यांना तो सांगणे शक्य नव्हते. डॉ. जोशी हे समाजवादी आहेत. हे

व्यावहारिक सत्य, त्यांच्या समाजवादी दृष्टिकोनाचे पारदर्शक स्वरूप प्रत्येक अंकाच्या संपादकीयातून दिसायला हवे होते, तसे ते दिसत नाही.

'युगवाणी'च्या वाचकवर्गाचे रास्त दडपण 'युगवाणी' चालवणाऱ्या संस्थेवर नाही. कारण तो वाचकवर्ग उच्चभ्रू, अलिप्त, आप्तमग्न असा आहे. उलट 'लोकमत' चा वाचकवर्ग बहुजन समाजातून वर आला आहे. हा वर्ग संपादकाला दक्ष ठेवतो किंवा संबंधित नियतकालिकाकडे पाठ फिरवून मालकाला ताळ्यावर आणतो. दैनिकाच्या संपादकाची मालकाची प्रतिष्ठा आणि पोट या दोन्ही गोष्टी जनतेच्या पाठिंब्यावर अवलंबून असतात. उलट 'युगवाणी' सारख्या नियतकालिकाचे चालक आपली प्रतिष्ठा अंक वेळच्यावेळी निघण्यावर अवलंबून नाही असे मानण्याइतके निर्ढावलेले. म्हणजे डॉ. जोशी यांच्यासारख्या प्रामाणिक संपादकाची कुचंबणा होते, जनतेशी संवाद साधताना खूप काही टिकावू आणि भरीव असे देण्याची तीव्र इच्छा असूनही ते पुरेसे यशस्वी होत नाहीत. 'युगसंवाद' साधण्याची डॉ. जोशींची ही काहीशी शोकांतिका मान्य करूनही वाङ्मयीन वैचारिक, नियतकालिकांचे पोषण करण्याच्या त्यांच्या धडपडीला दाद दिली पाहिजे.

**डॉ. वि. स. जोग**

■

## अयनांश

*(अयनांश : ले. डॉ. बेगम जहाँ आरा, अनुवाद डॉ. अपर्णा झा, पद्मगंधा प्रकाशन पांडुरंग कॉलनी, एरंडवन, पुणे ४, पृ. २१६, मूल्य १५० रु. )*

**म. श्री. दीक्षित**

१९७१ मधील बांगला देशच्या युद्धाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली 'अयनांश' ही कादंबरी. डॉ. बेगम जहाँ आरा या तिच्या लेखिका. त्यांच्या मूळ वंग भाषेतील कादंबरीचा डॉ. अपर्णा झा यांनी नुकताच मराठी अनुवाद केला असून शरद-साहित्याच्या अभ्यासक श्रीमती ज्योत्स्ना देवधर यांचे तिला प्रशस्तीपत्र लाभले आहे. अनुवादिका अपर्णा झा वंग भाषेच्या चांगल्या जाणकार असल्याने त्यांचा अनुवाद सहजसुंदर उतरलाय ही गोष्ट वाचता वाचताच जाणवते.

कादंबरीची मनीरा ही मुस्लिम नायिका असून तिच्या वैवाहिक जीवनाची करुण कहाणी दोन भागांत या कादंबरीत चित्रित केली आहे. पाकिस्तानच्या पाशवी कृत्यांना कादंबरीत गौण स्थान आहे. पुरुषी वृत्तीने सदैव वागणारा भोगवादी नवरा (राशेद), केया, जया या दोन मुली आणि रंकू हा मुलगा ही चार मनीराच्या घरातली माणसं. नवऱ्याने संसार वाऱ्यावर सोडून दिल्यामुळे तिच्या वाट्याला खूप काबाडकष्ट नि उपासमार येते. कष्ट उपसत असताना अधूनमधून पराकी रझाकारांच्या टोळधाडींनाही तिला तोंड द्यावं लागतं. रझाकारांशी मुकाबला करणाऱ्या मुक्तिवाहिनीच्या कार्यकर्त्यांविषयी तिला विलक्षण सहानुभूती असते. मुक्तियाद्धयांचा

छळवाद तिला सहन होत नाही. भर पावसात चिखल तुडवीत मुलांना घेऊन ती अखेर कोलकत्याचा रस्ता धरते. तिथे पूर्वायुष्याच्या आठवणी काढीत आणि बेजबाबदार नवऱ्यावर जळफळत जीवन कंठत असतानाच तिला पाकिस्तानच्या पराभवाची नि बांगला देशच्या मुक्तीची वार्ता कळते. मग साहजिकच मातृभूमीच्या, मातृभाषेच्या, तेथील मातीच्या ओढीने ती परत स्वदेशी प्रस्थान ठेवते.

मनीरा प्रेमळ, कष्टाळू, सोशिक, जिद्दीची स्त्री आहे. नवऱ्याचा विरोध असूनही ती खाजगीरीत्या शिकून पदवीधर होते. कुराणाचा अभ्यास करते. देश मुक्त झाला, पण आपण भोगवादी पुरुषी वर्चस्वातून मुक्त झालो का, या प्रश्नाने तिचं मन आक्रंदून उठतं. तिला उत्तर गवसत नाही आणि ती पुन:पुन्हा 'एकच प्याला'तील सिंधूप्रमाणे नवऱ्याशी एकनिष्ठ राहते. अशी ही सुशिक्षित मुस्लिम स्त्रीची करुणाजन्य भ्रमणगाथा 'अयनांश' कादंबरीत चित्रदर्शी भाषेत चांगली रंगवली गेली आहे. बांगला देशातील दरिद्री ग्रामीण जीवनाचे उठावदार दर्शन ही तिची आणखी एक जमेची बाजू.

■

## 'लोकगीतातील ओवीचे कलात्मक संकलन'-<br>'दगडी जात्याचा रेशमी गळा'

*('दगडी जात्याचा रेशमी गळा'– भगवंत देशमुख- प्रतिमा प्रकाशन-पुणे. पृष्ठे १४८. मूल्य १०० रुपये.)*

### प्रा. डॉ. चंद्रकांत धांडे

'दगडी जात्याचा रेशमी गळा' या संग्रहात मराठवाड्यातील पैठण, पारडगाव आणि बीड जिल्ह्यातील जात्यावरील ओव्यांचे संकलन आहे. प्राचार्य भगवंतराव देशमुख यांचा जन्म पैठणचा. परभणी जिल्ह्यातील पारडगाव हे त्यांचे आजोळ. निजामाच्या राज्यात भगवंतरावांनी पैठण-औरंगाबाद आणि हैदराबाद येथे शिक्षण घेतले. गुलबर्गा येथील शासकीय ज्ञान-विज्ञान महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली. ते औरंगाबाद येथील ज्ञान-विज्ञान महाविद्यालयाचे प्राचार्य या पदावरून सेवानिवृत्त झाले. मराठी भाषेला सर्व प्रकारची प्रतिकूलता असताना निग्रहाने मराठी भाषा आणि वाङ्मयाचा अभ्यास करणारे, मराठीचे जोपासना करणारे, हैदराबाद येथे मराठी भाषेच्या विकासासाठी मराठवाडा साहित्य परिषद स्थापन करणाऱ्या मंडळीचे प्रतिनिधी म्हणून प्रा. देशमुखांचे नाव घ्यावे लागेल. मराठवाड्यात डॉ. ना. गो. नांदापूरकर यांनी पहिल्यांदा ओव्यांचे संकलन केले. प्रा. देशमुखांनी प्रदीर्घ काळ सांभाळून ठेवलेल्या ओव्या या संग्रहामुळे प्रकाशात आल्या.

एकेकाळी पहाटेच्या अंधारातच जात्यांची घरघर आणि नादमधुर, लयबद्ध ओव्यांचे स्वर कानावर येणे हा सार्वत्रिक अनुभव होता. हळूहळू पिठाच्या गिरण्या खेड्यापाड्यात

पोचल्या आणि जाते अडगळीत गेले. जन्मभर दळण दळण्याचे कष्ट करणाऱ्या स्त्रियांच्या श्रमाची जाणीवही न ठेवणाऱ्या समाजमनाचे प्रतीकच असलेले दगडी जाते नामशेष होत असल्याबद्दलच्या परिस्थितीचे स्वागतच केले पाहिजे, पण त्यामुळे 'स्त्रीच्या मनोभावांचा, सुखदु:खाचा आणि बऱ्यावाईट अनुभवांचा जात्यावरील ओव्यातून होणारा आविष्कार थांबणार, त्याला उपाय नाही. एका अनोख्या सौंदर्याने नटलेला व स्वानुभूतीने लगडलेला वाङ्मयप्रकार वाऱ्यावर विरून जाण्यापूर्वी संरक्षित होणे अगत्याचे वाटल्याने' हा संग्रह साकार झालेला आहे.

जात्यावरील ओव्या ग्रामीण भागातील असल्याने शेतकरी जीवनातील संदर्भ येथे आहेत. चांगला पाऊस पडावा, भरपूर पीक यावे असे शेतकऱ्यांना वाटणे स्वाभाविक आहे. पैठणला गोदावरीला पूर आला म्हणजे दुथडी भरून वाहणारे पाणी फेसाळलेले असते. या पाण्याचे वर्णन-

*'गंगाबाई तुह पानी जशा दुधाच्या ऊकळ्या*
*भोळ्या शंकरानं जटा सोडल्या मोकळ्या*

अशा कल्पकतेने येते. अनेक ओव्यांत स्त्री रूपाचे सौंदर्य नाजूकपणाने रंगविलेले दिसते. कधी शाळेत न गेलेल्या, खेड्यात राहणाऱ्या या स्त्रिया किती कल्पक आणि रसिक आहेत याची उदाहरणे या संग्रहात आहेत.

*'लंबे लंबे बाल तुझ्या बालाचा बिछवना*
*सडपातळ महा राघू तुह्या सेजला दिसना'*

आपल्या सुनेचे केस इतके लांब आहेत की त्यांचाच बिछाना झाला आणि आपला मुलगा सडपातळ असल्याने त्यात झाकून गेला, तो दिसत नाही. येथे 'लंबे लंबे बाल' हा उर्दूचा प्रभाव स्पष्ट आहे. आपल्या मुलीचे केसही सुनेच्या केसासारखे लांब आहेत. त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे-

*'लांब लांब केस पलंगाखाले गेले*
*माह्याग मयनच्या कंथान गोळा केले'*-

आपल्या मुलीचे लांब लांब केस पलंगाखाली लोंबत होते. आपल्या जावयाने ते गोळा करून नीट केले.

गवळ्याचा धंदा घरी असलेल्या स्त्रियांच्या ओव्यात आपला नवरा, भाऊ, मुलगा यांच्याविषयीचा अभिमान आणि समाधानही व्यक्त होते.

*'गवल्या माह्या दादा तुह गवूल मातल*
*तूझीया हाल्यान तुशी इंद्रावन खेटील*
*पानवंताच्या मालनी तुम्ही वाल्याना वाल्याना*
*मह्या ग गवल्याच्या गायी सख्याच्या आल्याना'*

आपल्या भावाच्या गायीम्हशी रानात जाण्यासाठी निघाल्या की सर्व रस्ताच व्यापून

टाकतात म्हणून पाणवठ्याकडे निघालेल्या स्त्रियांना ती बाजूला होण्यास सांगते. या धंद्यात आपल्या मुलाने कोवळ्या गवतासाठी रानोमाळ भटकणे, एखाद्या मुलाने जनावरांना चरावयास नेताना आपल्या बायकोलाही बरोबर नेणे असे प्रसंग आहेत. दुधात पाणी घालून गोड गोड बोलून लोकांना फसवणारा गवळीही या वर्णनात डोकावतो.

ग्रामीण भागातील नवविवाहित स्त्री-पुरुषांना अनेक बंधने असत. वडील माणसांचा मानमरातब सांभाळण्याचे दडपण त्यांच्यावर असे. वडील माणसांसमोर एकमेकाशी बोलण्याचीही रीत नव्हती. अशा परिस्थितीत-

*'गोरी गेली पान्या नृ चतुर गेला, आंघोळीला*
*तिथं कशाचा गुंता झाला?'*

असा मिस्किल प्रश्न एखादी स्त्री विचारते.

स्त्री-मनाच्या विविध भावभावनांना या ओव्यात सुंदर रूप लाभलेले आहे. आपला पती पहिलवान आहे. त्याचे लक्ष परक्या स्त्रीकडे जाऊ नये असे पत्नीला वाटते. ती आपल्या नवऱ्याच्या वाटेत येऊ नये. ती त्याला दिसू नये म्हणून तिला दिलेली सूचना-

*'नवतीचे नारी तुही नवती जालीम*
*तुझ्या पान्याच्या वाटला मह्या सख्याची तालीम'*

आपला पती देखणा आहे, याचा अभिमान असलेली स्त्री त्याच्या रूपाचे वर्णन करताना म्हणते-

*-'हात ग हालवूनी मह्या सख्याची चालनी*
*दुकान सोडून पाहू लागल्या वानिनी'-*

हात हालवून झोकात चालणारा आपला नवरा इतरांचे लक्ष सहज वेधून घेतो त्यामुळेच वाण्याच्या बायका दुकान सोडून त्याच्याकडे पाहू लागल्या. निजामाच्या राज्यात गावोगावी आडदांड पठाण होते. ते मशिदीच्या ओट्यावर बसून असत. सावकारीचा धंदा करीत. राजाश्रय असल्याने आपल्याला आवडलेली स्त्री ते पळवून नेत. आपल्या मर्द भावाच्या पराक्रमाचे वर्णन एका स्त्रीने केले ते असे-

*'जानी (जवानी) मंधी जानी (जवानी) मह्या बंधवाची जानी (जवानी)*
*नेली पठानाची रानी'-*

-स्त्री-पुरुष संबंधात मर्यादा असावी. तारुण्यावरही नियंत्रण असावे याचे भान असावे असे वडिलकीच्या नात्याने सांगणारी स्त्री म्हणते-

*-'नवतीचे नारी नग होवू तू बावरी*
*तीळ जातील झडून कोळ पडेल वावरी'-*

तिळाच्या झाडाला लागलेल्या हिरव्यागार बोंडात तिळाचे दाणे भरलेले असतात. झाड

वाळल्यानंतर ही बोंडे उलटी केली की तीळ खाली पडतात आणि कोळ म्हणजे सुकलेले झाड शेतात आडवे पडते ही जाणीव महत्त्वाची असते.

बाहेरख्याली नवऱ्याच्या वर्तनाचा राग, आपल्या पतीच्या अनुपस्थितीत आपल्या शरीराने प्रियकराला केलेले आवाहन, रुप्याचे ताट (बायको) आणि केळीचे पान (परस्त्री) यांची किंमत, पतीच्या प्रेमाचा अनुभव सांगणारे प्रसंग. गावाला गेलेल्या पतीचा विरह अशा अनेक भावनांचे दर्शन या संग्रहातील ओव्यांतून घडते. स्त्रीला अहेव मरण यावे असे वाटत असते. अहेव मरणाच्या ओव्या सर्वत्र आढळतात. आई-वडिलांच्या संपत्तीपेक्षा पतीचा सहवास जन्मभर लाभावा असे स्त्रीला वाटत असते-

***'काय करायाची माय बापाची संपत***
***जावो मह्या जलमाला भोळ्या राजाची संगत***
***आहेव मरनाचा जसा दांडोरा पीटीला***
***माय भयनीन डाव सयीनं जिंकीला***
***आहेव मरन मी त मागते सोयीचं***
***मायभयनीचं वान घेतलं सयीचं***
***आहेव मरन भर्ताराच्या मांडीवरी***
***पुतुर महा खांदेकरी न सून मालन सेवा करी'***

हे केवळ ग्रामीण भागातीलच नव्हे, तर सर्वच स्त्रियांचे स्वप्न असते.

–या संग्रहातील काही ओव्या समाजात बदल झाल्याच्या निदर्शक आहेत. आपला मुलगा शाळेत जाऊ लागल्यानंतर गुरुजींनी त्याला छडी मारू नये असे त्याची आई म्हणत नाही. आपल्या बाळाला हळूच छडी मारावी म्हणून पंतोजीला मी खारीक देण्याचे कबूल केले असे ती आपल्या सखीला सांगते. शाळेत जाणाऱ्या मुलांच्या पाठीवर दप्तराचे ओझे लादण्याची परंपरा पूर्वीपासूनच दिसते.

***'साळत जाताना रडू कशीयाचं येतं***
***प्रानाच्या बाळाला वझं दप्तरांच व्हतं***

आपल्या मुलाला विद्या यावी म्हणून गुरुजींचे बरेच लाड केले जातात असे दिसते-

***'साळच्या पंतोजीला देऊ केली ताटवाटी***
***माझ्या बाळराजा नका मारु छडी काठी***
***शाळेच्या पंतोजीला देऊ केली शालजोडी***
***लाडका बाळ माझा लिहीतो बाराखडी'-***

–आई, भाऊ, दीर, भावजय, नणंद यांच्याविषयी विपुल ओव्या आहेत. आईच्या मायेची सर कशालाही येत नाही. आईच्या मायेमुळे आपणास मोठेच बळ आहे असा अभिमान पुढील ओवीत दिसतो-

*'दुधामधे दूध न दूध चांगलं गाईचं*
*शंभर मह गोत न सूख मावली बाईचं*
*जातं मी वढीते जसं हरन पळतं*
*मायबाई तुह दूध मनगटी खेळतं*
*जातं मी वढीते जसं बाह्या बळ माझं*
*येले बाळपनी मायबाई दूध तूझं.'-*

स्त्री जीवनात आईच्या खालोखाल भावाला महत्त्व आहे. भावाविषयीच्या ओव्या प्रामुख्याने दिवाळीच्या निमित्ताने आलेल्या आहेत. भावाने आपल्याला लुगडे घेतले याचा बहिणीला अभिमान वाटतो. भावाने घेतलेल्या लुगड्याची किंमत ती फुगवून सांगते-

*—'पाचाचं लुगडं मी त सांगते दहाचं*
*सांगते सईबाई मला भूशेन भावाचं'—*

-अनेक भागांत आपल्या भावाची मुलगी सून करून घेण्याची प्रथा आहे. हे नाते सोयीचे असते कारण-

*'भाऊ करावा ग याही आपल्या भेटीसाठी*
*सोयरा भाऊराया घरी येईल लेकीसाठी*
*भाऊ करावा ग याही भावजय ती ईहीन*
*सांगते तान्हाबाई नातं पडंल सोयीनं'*

—मराठवाड्यात जावयाचा फार मान राखला जातो. त्याला खूश ठेवण्याचे सर्व प्रयत्न केले जातात पण सगळे जावयी सारखे नसतात-

*—'जावई सावळे सोन्याचं इंद्रावन*
*अन्राड मही भैना देली तुळस लावून'-*

आपला जावयी म्हणजे सोन्याचे वृंदावन आणि आपली भोळीभाबडी लेक म्हणजे तुळस-ती वृंदावनात लावली. जावयाविषयीचा सर्वसाधारण अनुभव मात्र चांगला नाही.

*—'जावयाची जात हाय बयमान खरी*
*देली सोनीयाची सरी न्हाई याच्या उपेकारी'—*

सोन्याच्या सरीसारखी आपली लेक दिली पण जावयाला तिची किंमत नाही.

-पैठण परिसरातील ओव्यांत संत एकनाथ, पैठण आणि या परिसरातील लोकजीवनाचे चित्रण आहे. दक्षिणकाशी म्हणून पैठणला महत्त्व आहे. मराठवाड्यात गोदावरीला गंगाच म्हणतात. नाथांच्या समाधी मंदिरामागे गंगेचे विस्तृत पात्र आहे- तिचे वर्णन.

*—रूसली गंगूबाई चालली रागं रागं*
*नाथ ग रायानं जागा देली पाठीमागं—'*

पैठणच्या ओव्यात ऐतिहासिक संदर्भ आहेत. पैठणला बारा वेशी आहेत. येथील सावकार वानोळे यांच्या हवेलीला तुपाची पन्हाळे आहेत. नाथांच्या घरी पांडुरंग गंध उगाळतो. श्रावण महिन्यात गोदावरीने धारण केलेले उग्र रूप पाहून नावा हाकणारे तारु भयभीत होतात. नाथांच्या कृपेने नावा सहजपणे पैलतीर गाठतात. नाथांच्या वाड्यात होणारा गोकूळअष्टमीचा उत्सव, उत्सवातील परंपरा यांचे वर्णन ओव्यांत येते याचे कारण नाथांविषयी श्रद्धा आणि भक्ती-

*–'गाव पयठन हाय पुन्याची पायरी*
*गावात नाथराया वारी भरते भाइरी*
*जाईच्या फुलाचा गुंफीते विजनवारा*
*देवा नाथराया तुझ्यासाठी तालुकदारा'–*

पैठण ही पुण्यवान नगरी असून गावात एकनाथांचे मंदिर आहे, पण दर एकादशीला आणि नाथषष्ठीला नाथांच्या समाधी मंदिराजवळ वारी-यात्रा भरत असते. येथे नाथांना देवा आणि तालुकदार-म्हणजे जिल्हाधिकारी म्हटलेले आहे.

–येथवर या संग्रहातील ओव्यांचा ओझरता परिचय करून दिला. शेतकरी जीवन, स्त्री-पुरुषांचे तारुण्य, गवळी समाजाचे जीवन, स्त्रीला मिळणारे पतीसुख, अपत्यप्रेम, आईच्या प्रेमाची महती, स्त्रीला वाटणारे बंधुप्रेम, नणंद-भावजय आणि जाऊ-दीर यांचे परस्परसंबंध, जावयाचे कौतुक, नाथरायाचं पैठण, विठ्ठल आणि रुक्मिणी यांविषयी श्रद्धा आणि भक्तिभाव असे विभाग करून त्या त्या विषयातील ओव्यांचे संकलन येथे आहे. या प्रत्येक भागाच्या प्रारंभी प्रा. देशमुखांनी केलेले भाष्य मार्मिक आणि अर्थपूर्ण आहे. या ग्रंथाची प्रस्तावना लोकसाहित्याच्या अभ्यासकांना मोलाचे मार्गदर्शन करणारी आहे. संग्रहाच्या शेवटी ओवीचे भाषाविशेष, मराठवाड्यातील म्हणी आणि वाकप्रचार परिशिष्टात दिलेले असून मराठवाड्यातील लोकसाहित्यात येणाऱ्या शब्दांच्या बदलाचे विश्लेषण आहे. मराठवाड्यातील ओवी वाङ्मयातील हे भांडार म्हणजे लोकसाहित्यातील मोलाची भर आहे. प्रा. देशमुखांनी केलेल्या या कामगिरीचे ऋण अविस्मरणीय!

**डॉ. चंद्रकांत धांडे**
फ्लॅट क्र. ४
सागर प्लाझा, ज्योतीनगर
औरंगाबाद ४३१००५.

■

---

## स्वागत

**आधुनिक ऋत्विज,** बाबा आमटे, डॉ. धैर्यशील शिरोळे, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, ४८
**भक्तिरामायण,** कुसुम स. जोशी



अनुक्रमणिका






संत साहित्याची आवश्यकता पटवून देणारा संग्रह

## ''उरतील अंतरी तेजाचे कण''

*('उरतील अंतरी तेजाचे कण' (ललित लेख संग्रह) डॉ. सौ. प्रज्ञा आपटे स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस पृ.- १२८, मूल्य रु. १००/-फक्त)*

**श्रीकांत भा. गोंधळेकर**

'उरतील अंतरी तेजाचे कण' हे शीर्षक वाचल्यानंतर मनात ज्या अपेक्षा निर्माण होतात, त्या सगळ्या अपेक्षांची पूर्तता करू शकणारा ललित लेख संग्रह, असं डॉ. सौ. प्रज्ञा आपटे ह्यांच्या ह्या संग्रहाचं वर्णन केलं तर ती अतिशयोक्ती ठरणार नाही. सगळीच जीवनमूल्ये बदललेल्या आजच्या परिस्थितीत आदर्श समाजजीवनाचं किंवा आदर्श समाजरचना कशी असावी ह्याचं जिवंत चित्र, या संग्रहातल्या, गतस्मृतींवर आधारित बऱ्याच लेखांतून पहायला मिळतं. अर्थात अतिशय गतिमान झालेल्या आजच्या जीवनांत पन्नास वर्षांपूर्वीची संथ जीवनशैली कुचकामी ठरते, पण त्याचा परिणाम जीवनमूल्यांवर होणं अपेक्षित नाही आणि अनुकरणीयही निश्चितच नाही. परंतु निव्वळ भोगवादी संस्कृती अंगिकारल्यामुळे आजचा माणूस भौतिक सुखसोईच्या मागे लागलेला आहे. ह्या सुखसोई आपल्याशा करण्याकरिता लागणाऱ्या अर्थार्जनासाठी कुटुंबातले बहुतेक सगळेच पैसा मिळविण्याकरिता जीवाची काहिली करीत फिरत आहेत. त्यामुळे साहजिकच अनंतकाळाची माता असणारी स्त्री घराचा उंबरठा ओलांडून कार्यालयाचा उंबरठा झिजवायला लागली. असं करताना साहजिकच पुढची पिढी घडवायचं तिचं जे आद्य कर्तव्य आहे त्याच्याकडे तिचं दुर्लक्ष होऊ लागलं. आणि त्यातूनच रोडरोमियोगिरीत धन्यता मानणारी आणि त्यासाठी काहीही करू शकणारी आजची मूल्यहीन पिढी तिने या समाजात रुजू केली. अर्थात याला स्वत: लेखिकेसारखे अपवाद निश्चितच आहेत.

त्यामुळेच 'उरतील अंतरी तेजाचे कण' ह्या लेखात लेखिका लिहिते की, आम्ही सुद्धा नाती, जिव्हाळे आणि ऋणानुबंध जपायला शिकले पाहिजे. प्रामाणिकपणा, कष्ट ह्यांच्या जोडीने आदर्शाची स्वप्ने बघायला शिकले पाहिजे. अंतरात तेजाचे कण आम्ही जपले तर अशा सावटाची खंत करण्याचे कारणच नाही. आज समाजांत आदर्श समाजमूल्यं लयाला गेली आहेत. त्यामुळे लेखिकेला 'उष:काल होता होता....' सारख्या लेखातून सांप्रत समाजव्यवस्थेचे स्पष्ट प्रतिबिंब मांडता आले आहे. लेखिकेने चाळीस वर्षांपूर्वीचं वातावरण अनुभवलंय आणि आज भौतिक प्रगतीच्या अतिरेकी सोसापायी पर्यावरणाकडे दुर्लक्ष केल्याने वाढलेलं प्रदूषण आणि तदनुषंगिक वैशाख उन्हं आज माणूस सोसतोय, ह्या परिस्थितीचं चपखल वर्णन 'काचेपलिकडचा ग्रीष्म' मधे आपल्यालाही अनुभवता येतं. या सगळ्या परिस्थितीत कविहृदयाची माणसं अस्वस्थ झाली नाहीत, तरच नवल. मनाची ही अस्वस्थता 'चैत्रपालवी' मधून वाचायला मिळते.

समाजाच्या बदललेल्या ह्या मूल्यांचा माणसांवर जो काही परिणाम झाला आहे, त्याचं एक फलित म्हणजे माणसांच्या बोलण्यात आणि वागण्यात कमालीची तफावत आली आहे. सभासंमेलनातली भाषणं (बाजी) आणि वास्तव यातलं अस्पष्ट अंतर लेखिकेने 'ती भिंतीवर - मी एकांती' ह्या लेखातून फारच हळुवारपणे सुंदर शब्दांत दृग्गोचर केलं आहे. हे अंतर डोळ्याने दिसावे इतके सुंदर शब्दचित्र लेखिकेने या लेखातून रेखाटले आहे. तसेच 'वठलेली मखमल' ह्या लेखात आई आजारी आहे हे कळल्यावरही बालवयीन समीरचं प्रौढ वागणं आणि बोन्साय यांची सुंदर सांगड यशस्वीपणे घातली आहे. मुलांसाठी पुरेसा वेळ न देऊ शकणारी नोकरी करणारी आई आणि बोजड अभ्यासक्रम आणि न पेलणारी दप्तरे, न संपणारा अभ्यास यात मुलांचे हरवलेले बालपण या पार्श्वभूमीवर घरात केलेलं बोराचं बोन्साय मोकळ्या हवेत लावून येणाऱ्या आईची कृती खूप काही सांगून जाते. याचप्रमाणे भौतिक सुखोपभोगाच्या लालसेपायी आणि त्यासाठी भरपूर पैसा मिळविण्याच्या नादात प्रसंगी परदेशात जाणाऱ्या मातापित्यांपुढील पोटच्या पोरांच्या संगोपनाबाबत होणारी हेळसांड वाचणाऱ्याला चीड आणि कीवही यावी अशा शब्दात अभीची, आणि त्याला लळा लावणाऱ्या त्याच्या आजी-आजोबांची अभीला मुलीकडे परत पाठवताना मनाची होणारी घालमेल 'प्रश्न' ह्या लेखात परिणामकारकपणे मांडली आहे.

अशा अप्रतिम ललित लेखांसोबतच या संग्रहात 'निष्कासित' आणि 'संवर्धन' या डॉ. कविता शनवारेंच्या हिंदी कथांचा स्वैर भावानुवाद व 'हिमशिखरांच्या कोंदणातला प्रदेश,' ''उत्कट भव्य तेची घ्यावे'', 'जिकडे पहावे तिकडे अपार' असे काही प्रवासवर्णनपर परंतु ललित निबंधाच्या स्वरूपाचे लेख सापडतात.

डॉ. प्रज्ञा आपटे ह्या संत साहित्याच्याही गाढ्या अभ्यासक आहेत. त्या अनुषंगाने (त्यांच्या ह्या अभ्यासाचे प्रतिबिंब) प्रतिकूल परिस्थितीतही केवळ मनाची पकड सैल न होऊ देता, आपल्या मनाची प्रसन्नता कायम ठेवून प्रतिकूल परिस्थितीला कसे अनुकूल करून घेता येते हे, 'वादळमिठीतले चाफ्याचे झाड', 'अरूपाचे रूप दाखविणारी अक्षरे', 'नामघोषगौरवे धवळले विश्व', 'भक्तिप्रेम गोडी बैसली जिव्हारी', 'विज्ञानयुगाला ज्ञानेश्वरीचे देणे', 'मागे ओस फूल देठी', 'नामा म्हणे नाम जाण', 'एकनाथांचे काव्यविषयक विचार', 'संचित', 'समाधी' इ. लेखांमधून रिपब्लिकन सिद्धांत, ज्ञानदेव, तुकाराम, एकनाथ, कार्ल मार्क्स यांची उदाहरणं देऊन संतसाहित्याचं माहात्म्य उत्तम रीतीने पटवून दिलं आहे. शेवटी असं म्हणणं धारिष्ट्यांच ठरणार नाही की, आजच्या परिस्थितीत भरकटलेल्या माणसांना पुन्हा वठणीवर आणण्याचं काम फक्त संतसाहित्यच करू शकतं, हा विचार, 'उरतील अंतरी तेजाचे कण' हा ललित लेखसंग्रह समर्पकपणे देऊन जातो.

**श्रीकांत भा. गोंधळेकर,**
द्वारा, श्री. भा. अ. गोंधळेकर,
अनंत खेडकर नगर,
अकोला ४४४००१

■

## वेदनांचा मेकॅनो– 'आकांत प्रिय माझा'

*('आकांत प्रिय माझा' (काव्यसंग्रह) छाया कोरेगावकर संवेदना प्रकाशन, मुंबई पृष्ठ - ५० मूल्य - ४५ रुपये)*

**डॉ. भगवान ठाकूर**

'संवेदना प्रकाशन', मुंबई द्वारा प्रकाशित छाया कोरेगावकर यांचा 'आकांत प्रिय माझा' हा भांगेत तुळस असा आगळावेगळा काव्यसंग्रह असूनही बराच अलक्षित राहिलेला दिसतो. शुद्ध वियोग ब्रह्माचा साक्षात्कार देणारी ही भावोत्कट कविता आहे. वेदनांचा विविधांगी मेकॅनो तशी ह्या संग्रहातील कविता आहे. मनोविश्वाचा पट प्रांजळपणे उलगडून आपलेपणाच्या विश्वासाने स्वदु:खवेणा सहृदय वाचकांसमोर हळुवारपणे मांडणारी ही कविता आहे. तरल, सूक्ष्म आणि सेंद्रिय अनुभवाभिव्यक्ती करणारी ही कविता स्वत:च्या अनुभवांशी इमान राखूनच प्रतिमा आणि प्रतीकांची चित्रमयी शैलीत अभिव्यक्ती करते. 'शब्दांवाचुनी जाणिले शब्दांच्या पलीकडले' असा प्रत्यय देणारी ही अल्पाक्षरी पण बहुअर्थप्रसव कविता आहे. यातील कविता म्हणजे जणू आत्यंतिक संवेदनशील, प्रेमातुर, भावुक अशा आत्ममग्न मनाचे भग्नावशेषच होत. उदा.

***''माझ्या साऱ्याच खिडक्या***
***मिटवलेल्या***
***चंद्रस्पर्शाचे डंख चुकविण्यासाठी''*** (पृ. ४)

किंवा

***''घनघोर चांदण्यात***
***थकलेले दोन अश्रू***
***पापणीच्या काठावर''*** (पृ. ७)

यातील चांदणे हे जर प्रीतीचं, प्रेमीजनांच्या मीलनावेगाचं प्रतीक मानलं तर थकलेले दोन अश्रू 'त्याची' वाट पाहण्यातील दु:ख, विरहवेदनेचं रूप प्रकट करतात. काहींना ह्या संग्रहातील काही कविता प्रेमभंगाचा किंवा प्रियकराकडून प्रेमपूर्तीची अपेक्षा व्यक करणाऱ्या एकाच आशयाच्या, एकसूरी वाटण्याची शक्यता आहे. परंतु खरं तर तिथंच कवयित्रीला त्यांचा स्वाभाविक आतला सूर सापडलाय असे जाणवते. विचार आणि भावानुभवांची एक प्राणभूत लय स्वरांच्या ओंजळीत साठवूनच ह्या कविता साकार होतात त्यामुळे कुठे क्वचित लयीचा तोल ढळलेला वाटत असला तरी त्यामुळे कविता वाचकाच्या काळजाला भिडण्यात कुठेही व्यत्यय येत नाही. आत आत आर्त आणि आतुरल्या भावनांचे गंधकोष अळवारपणे उलगडून दाखविणारी ही नाजूक, नितळ कविता आहे. मातीच्या निरागस भाळावर धुमारण्याचा अभिशाप कुणी नोंदविला? कवयित्रीच्या प्रश्नाचं उत्तर नियतीच्या पलीकडेही काही असू

शकते. आणि हे जे काही आहे त्यातूनच कवयित्री म्हणते,

*''दारात आयुष्य कधीच खोळंबलेलं*
*कदाचित माझ्या कपाळावरच्या*
*कुंकवाचा परीघ*
*तुझ्या कुंचल्याशिवाय अपुरा*
*राहिला असावा''* (पृ. ५)

हे असे अधुरेपण, अपुरेपण सतत कवयित्रीच्या मनी-मानसी कोलाहलताना दिसते. म्हणूनच की काय त्या उद्गारतात,

*''तुझ्या ओंजळभर चांदण्यांसाठी*
*मात्र जाता जाता*
*काही संदर्भ पेरून जा*
*माझ्या तुळशीवृंदावनातल्या*
*सहनशील मातीत.''* (पृ. ८)

आभाळापेक्षा माती नेहमीच सोशिक आणि सहनशील असते. मातीच्या मीलनासाठी आभाळही कधीतरी झुरणीला लागते. माती नेहमीच आसुसलेली असते पण कळत नाही ते आकाशाला, म्हणूनच ती म्हणते,

*''मी सारे संदर्भ*
*गोंदवून घेतलेत शरीरभर*
*आता आभाळ झुरणीला*
*लागणार नाही*
*अन् माझी मातीही*
*आसावणार नाही*
*मी श्रावण बंदिस्त केलाय*
*पापणीआड*
*हवा तेव्हा मुक्त बरसण्यासाठी.''* (पृ. ११)

गतकाळात कधीतरी त्याच्या सहवासात गच्च आनंदाचे तृप्त क्षण तिने भोगलेले जाणवतात, त्या स्मरणाच्या श्रावणावर तिला भविष्यात जगण्याचं संजीवन मिळणार आहे. हे तिचं प्राप्त वास्तव आहे, पण तिचं मन अजून त्याची सय करते. त्याच्या नसण्यातूनही त्याच्या असण्याची अपेक्षा बाळगते,

*''तुझा हा वसंत काही काळ तरी*
*माझ्याकडे उधार राहू दे'' (पृ. १०)*

*किंवा*

*''तरीही तुझ्या आठवणी अजून*
*माझ्या अस्तित्वावर*
*संगीनी रोखून* (पृ. ४१)

प्रियकराच्या प्रतीक्षेत व्याकूळलेली 'ती' तशी सनातनच, पण कवितेतल्या 'ती'ची त्याच्या विषयीची उत्कटता इंदिरा संतांची आठवण करून देते.

*''प्राणपक्षी व्याकुळ माझा*
*वेशीवरी थांबलेला*
*ये वा तू येऊ नकोस*
*मी श्वास आहे रोखलेला''*(पृ. १२)

कवयित्रीच्या मनातली गर्द गहन व्याकूळता, प्रियकराच्या प्राप्तीसाठीचे आसुसलेपण ह्या संग्रहातील शब्दाशब्दातून प्रतीत होते. उदा.

*''अन् आसावलेला*
*प्राजक्त व्याकुळतो*
*तुझ्या शिंपणसड्यासाठी''* (पृ. १३)

ह्या कविता वाचताना काही वेळा वाटतं की कवितेतली 'ती' पुष्कळदा फक्त तिचीच अपेक्षा एकतर्फी फिर्यादीसारखी व्यक्त करीत जातेय. पण नंतर लक्षात येते की 'तो' जो कोणी आहे तो आरोप अमान्यही करीत नाही आणि गुन्हा कबूलही करीत नाही. अशा वेळी जे भावसत्य वाचकाच्या हाती गवसते ते,

*''माझी माती आता*
*पुरेशी शहाणी झालीय्*
*ती झाकून घेते*
*आभाळाचं नपुंसकत्व*
*आपल्या लालभडक कुंकवाखाली*
*झाकलेल्या गोंदणासारखं''* (पृ. १४)

पण याचा अर्थ असाही होतो की तो आहे तसाही तिला हवाय. तो लीन व्हावा असे नाही, पण तो तिच्यात विलीन व्हावा एवढेच तिचे मृण्मय मागणे आहे. म्हणूनच ती म्हणते,

*''पण निशिगंधाच्या बुंध्याशी*
*काढलेली*
*आसवांची रांगोळी*
*फक्त तुलाच समजू शकते.''* (पृ. १५)

छाया कोरेगावकर यांनी प्रस्तुत छोटेखानी काव्यसंग्रहात काव्यरचनेचे विविध आविष्कार साकार केले आहेत. अंगाईगीत, भावगीत, मुक्तकाव्य, गेय रचना बंध इत्यादी. 'स्पर्श स्पर्श

आळविता' ही पृ. ४० वरील कविता आशयसुंदर गीतासम आहे. काव्यात्म सुभाषितासारख्या काही ओळी वाटतात. उदा.-

*''उमलत्या कळीचं यौवन चुंबावं*
*मात्र कळीखालचा देठ खुडू नये''* (पृ. ४५)

किंवा

*''देण्यापूर्वी राखून ठेवण्याचे*
*हिशोब*
*कोवळ्या वयाला*
*पेलवतच नाही.''* (पृ. ४६)

स्त्रीसुलभ अशा ओवी छंदातही भावाभिव्यक्ती झाली आहे. उदा.

*''देवा तुझ्या पायापाशी*
*मागू कोणते रे सुख*
*छकुलीच्या आगमने*
*पूर्ण झाले नारीरूप.''* (पृ. ४७)

या कवितेतील निवेदनात्मकता सुद्धा भावोत्कट होऊन प्रकटते. उदा.

*''नेले खुडून त्याने*
*ते स्वप्न फुलांचे झेले*
*अनाम वाटांवरती*
*ती पेरीत जाते डोळे'* (पृ. ३२)

एखाद्यावर एकतर्फी प्रेम असावे अशी काहीशी ही कविता वाटते. कधी काळी त्याने तिला रसरसून देहमनाने सर्व काही दिलं असावं, आता मात्र 'तो' दूरस्थ झालाय. आणि तरीही ती त्याचं ते 'देणं' हेच कृतज्ञतेचं 'लेणं' मानून त्याला स्मरण कोषात जपते आहे. उदा.

*''परंतु कोऱ्या भाळी माझ्या*
*चंद्र स्मृतींचा होशील का?''* (पृ. ३९)

यातील कोऱ्या भाळावरून तिचा प्राणप्रिय सखा कायमचा दूरदेशी गेल्याचे सूचित होते. कवयित्री पुढे असंही म्हणते,

*''वठलेल्या झाडांना सोसवत नाहीत*
*अकाली फुटणाऱ्या पालवीच्या*
*गंधवेणा------''* (पृ. ३८)

अकाली फुटणारी ही पालवी मग आपला नैसर्गिक हक्कही मागते. तेव्हा कवयित्री म्हणते,

*''मी म्हटलं*
*पावसात घरटं वाहून जाईल रेऽऽ*
*तर चक्क पंखांवर*
*तू आभाळ तोलून धरलंस*
*आता सारंच कसं*
*छान जुळून आलंय*
*फक्त*
*माझ्या घरट्याला*
*एक कायदेशीर जमीन हवी!''* (पृ. ५०)

एकूणच ही कविता 'जमिनीचे आकाशाकडे केलेले मागणे' अशी वाटते. एक निखळ, विशुद्ध प्रेमभावकविता वाचल्याचे, वाचनानंतर समृद्ध झाल्याचे समाधान ही कविता देते, ह्यातच तिचे यश साठविले आहे. स्त्रीवादाचा कुठलाही अभिनिवेश न बाळगताही स्त्रीच्या अमाप दु:खभोगाचे सनातन करुणाष्टक ही कविता गाऊन जाते.

**डॉ. भगवान ठाकूर, मराठी विभाग**
BAM विद्यापीठ, औरंगाबाद

■

## कथा : रूप आणि आस्वाद

*('कथा : रूप आणि आस्वाद', लेखक : डॉ. पंडित टापरे, नीहारा प्रकाशन, पुणे, १९९९, पृ. १०८, मूल्य रु. ६०-००.)*

**दीपा प्रकाश सावंत**

लेखक, समीक्षक आणि वाचक हे अशा एका प्रवाहाचे घटक आहेत, की, जो प्रवाह अनुभव, ज्ञान आणि आनंद यांनी युक्त असणाऱ्या सागरास जाऊन भिडतो. लेखकाने आपल्या साहित्यकृतीमध्ये जे भावविश्व साकार केलेले असते, त्याचा वास्तव परिचयच समीक्षक वाचकाला करून देत असतो. समीक्षा म्हणजे दोषदिग्दर्शन करणारी 'टीका' असा एक सर्वसाधारण समज आहे. पण समीक्षा साहित्याकडे आणि जीवनाकडे बघण्याची नवदृष्टी देते. उदाहरणार्थ, एखादी कथा वाचल्यानंतर ज्या काही गोष्टी आपल्याला सहजासहजी जाणवत नाहीत, त्या गोष्टी समीक्षा वाचल्यानंतर चांगल्याच जाणवतात. याचा सततचा पडताळा डॉ. पंडित टापरे यांचे 'कथा : रूप आणि आस्वाद' हे समीक्षापुस्तक वाचताना मिळतो.

'कथा : रूप आणि आस्वाद'मध्ये डॉ. टापरे यांनी नामवंत कथाकारांच्या आठ कथा उपयोजित समीक्षेसाठी निवडलेल्या आहेत. त्या कथांमधून जे एक भावविश्व उभे केले गेले

आहे, त्यामागील वास्तव डॉ. टापरे यांनी उलगडून दाखविलेले आहे. कथांमधील गूढ अनुभव आणि व्यंजक गर्भितार्थ सोप्या शब्दांतून व्यक्त करण्याचे कौशल्यही त्यांनी येथे दाखविलेले आहे. प्रत्येक कथेचे वैशिष्ट्य, लेखकाचे वेगळेपण तर त्यांनी येथे सांगितलेले आहेच, पण त्याचबरोबर नवकथेची व साहित्यातील नवतेचीही ओळख त्यांनी येथे चर्चेच्या ओघात करून दिलेली आहे. तुलनेसाठी काही ठिकाणी त्यांनी नवकथेपूर्वीची एखादी कथा घेतलेली आहे. उदाहरणार्थ व्यंकटेश माडगूळकरांच्या 'बाजाराची वाट'ची समीक्षा करताना डॉ. टापरे यांनी ठोकळांची 'नीट नाकासमोर जा' ही कथा तुलनेसाठी घेतलेली आहे. या दोन्ही कथांतील साम्य व विरोध सांगत सांगत डॉ. टापरे माडगूळकरांच्या कथेचे सुरेख मूल्यमापन करतात.

'बिनचेहेऱ्याची संध्याकाळ' या गंगाधर गाडगीळांच्या कथेत यांत्रिक युगामुळे निर्माण झालेले अस्वास्थ्य, माणसामाणसांमध्ये तयार झालेली दरी, मानवी मनात दाटलेला एकाकीपणा, भावनांची निर्जीवता, अर्थहीनता यांबरोबरच जीवनात एकूणच आलेला बाजारीपणा आणि त्यामुळे हरवत चाललेले जीवनातले सत्त्व, या वास्तव स्थितीची जाणीव या कथेच्या समीक्षेतून आपल्याला होत असते. डॉ. टापरे यांनी या कथेची समीक्षा करताना नवकथेपूर्वीच्या मराठी कथेची गुणवैशिष्ट्ये सांगून गुणात्मक दृष्टीने नवकथा वेगळी व समर्थ कशी ठरते, हेही सांगितले आहे.

जी. ए. कुलकर्णी यांच्या 'प्रवासी' या कथेमध्ये प्रवाशाची जीवनाविषयीची ओढ, जीवनातील सुखांबद्दलची त्याची आसक्ती, प्रतिकूलतेतून मार्ग काढण्याची त्याची जिद्द, त्याने बाळगलेला भोगवादी दृष्टिकोन या सर्व गोष्टी आपल्या प्रत्ययाला कशा येत राहतात, हे टापरे कथेवरील समीक्षालेखाद्वारे दाखवून देतात. माणसाने बाळगलेली जीवनमूल्ये आणि विशिष्ट परिस्थितीत त्याच जीवनमूल्यांविषयी त्याच्या मनात निर्माण झालेली साशंकता यांचेच एक दर्शन या कथेत कसे घडते, हे टापरे सहजपणे विशद करतात.

'तिडीक, तिरडी आणि अनंतकाळ' या दिलीप चित्रे यांच्या कथेच्या आधारे डॉ. टापरे नवकथेचे आणि एकूण नवसाहित्याचे स्वरूप कसे विश्लेषक आहे, ते केवळ वर्णन-चित्रण करणारे कसे नाही, हे दिग्दर्शित करतात. या कथेतील नायक स्वच्छतेबाबत आत्यंतिक अट्टहास बाळगून असतो. त्यातून व्यक्तीची स्वत:चाच उपहास करण्याची वृत्ती आणि व्यक्ती आपल्या स्वत:च्या वर्तनाची शोधत असलेली कारणमीमांसा यांचेच एक आलेखन संपूर्ण कथाभर कसे होत राहते हे डॉ. टापरे सांगतात.

कमल देसाई यांची 'हॅट घालणारी बाई' ही गाजलेली कथा. या कथेतून सामाजिक जीवनात नीतिमूल्यांना जाणारा तडा, त्याची व्यक्तीला प्रकर्षाने होणारी जाणीव, व्यक्तीच्या वर्तणुकीतला विक्षिप्तपणा, भावनांमधील गोठलेपणा इत्यादींचे संसूचन दडलेले आहे, हे डॉ. टापरे आपल्या नजरेस आणतात. प्रतिभा, प्रतीके, वेचक विशेषणे इत्यादींच्या प्रभावी उपयोजनामुळे कमल देसाई यांच्या कथेला काव्यात्म रूप कसे प्राप्त झाले आहे, हे टापरे

दाखवून देतात. या हॅट घालणाऱ्या बाईचे व्यक्तित्व गूढ असते, तिचे वागणे विक्षिप्त असते, आणि तिचे अस्तित्व अनामिक असते. तिच्या व्यक्तित्व-पातळीवर रामव्यतिरिक्त कोणीच जाऊ शकत नाही. या कथेबाबतचे डॉ. टापरे यांचे हे आकलन पटण्यासारखेच आहे.

बाबूराव बागूल यांची 'विद्रोह' ही सर्वदूर गाजलेली कथा आपल्या उपयोजित समीक्षेसाठी निवडून जणू एक आव्हान डॉ. पंडित टापरे यांनी स्वीकारले आहे. शिक्षणामुळे संवेदनशील झालेले मन, स्वातंत्र्य, समता, बंधुता या तत्त्वत्रयीच्या घोषामुळे पोसली गेलेली माणूसपणाची जाणीव आणि सत्य, मांगल्य, पावित्र्य यांच्या संस्कारामुळे निर्माण झालेल्या अपेक्षा घेऊन जीवनात उभ्या राहू पाहणाऱ्या तरुण दलित मनाचे एक अपरिहार्य मोडून पडणेच या कथेत चित्रित झालेले आहे. कथानायकाची संवेदना, जाणीव आणि अपेक्षा एका बाजूला आणि समाजात अंमल असणारी विषमता आणि तुच्छता दुसऱ्या बाजूला. यातून कथानायक बंडाच्याच विचाराने घेरला जातो. बागुलांच्या या कथेची रचना कसदार, सशक्त आणि प्रभावी कशी व का झाली याची एक सुरेख मीमांसा डॉ. टापरे यांनी आपल्या परीक्षणात केलेली आहे. एका यशस्वी कथेची टापरेकृत तितकीच यशस्वी मीमांसा वाचताना साहजिकच आनंद होतो.

दलित कथेप्रमाणेच ग्रामीण कथेची मीमांसा करण्याकरिता म्हणून डॉ. टापरे यांनी आनंद यादवांची 'मोट' आणि बाबाराव मुसळे यांची 'रुखवत' या दोन ग्रामीण कथा निवडलेल्या आहेत. आनंद यादवांच्या 'मोट'मधील बाबू ग्रामीण जीवनातील निर्मळ स्वभावाच्या लोकांचेच प्रतिनिधित्व करणारा आहे. व्यवहारापेक्षा भावनेला अधिक महत्त्व देणाऱ्या बाबूला आपला बैल अत्यंत प्रिय असतो आणि म्हणूनच त्या बैलाच्या मृत्यूमुळे तो दु:खीकष्टी होतो. बाबूच्या भावाचा स्वभाव याउलट सरळ व्यवहारी असतो. आपल्या मेलेल्या बैलाच्या कातड्याची मोट शिवून घेऊन ती तो आपल्या विहिरीला जोडतो. त्याची ही व्यवहारी दृष्टी बाबूला सतत जाळत राहते. ग्रामीण जीवनात एकत्र बांधले गेलेले भावना व व्यवहार यांच्या संघर्षाचे अंत:स्रोत डॉ. टापरे आपल्या समीक्षेद्वारे उघडे करून दाखवितात. मुसळे यांच्या 'रुखवत' या कथेत खेडेगावातल्या लग्नसमारंभातील उपचार-सोपस्कार, मान-अपमान आणि त्यातून नात्यानात्यांमध्ये उत्पन्न होणारे ताणतणाव यांचे परिणामकारक चित्रण करण्यात आले आहे. खेडूत मनातील वेगवेगळे भाव व्यक्त करण्यासाठी कथालेखकाने संपूर्ण कथाभर 'डोळे' ही प्रतिमा अतिशय सूचकतेने व प्रभावीपणे कशी उपयोजिली आहे, हे डॉ. टापरे आपल्या समीक्षेत लक्षात आणून देतात. तसेच मान-अपमानविषयक कल्पनांमुळे क्षुल्लक प्रसंगांनाही कमालीच्या समरप्रसंगाचे स्वरूप कसे येत जाते हेही कथामर्म टापरे समजावून देत राहतात. उदाहरणार्थ, देवकीच्या माहेरच्या लोकांनी रुखवतावर हलक्या प्रतीचे लुगडे झाकले म्हणून त्याचे उट्टे काढण्यासाठी देवकीची भावजय तेच लुगडे करवलीला नेसवते. यातून दोन्ही पक्षांची अहंभावना दुखावली जाणे, एकमेकांवर सूड उगवून कुरघोडी करण्याचा प्रयत्न करीत राहणे, आक्रमक व हिकमती पवित्रे घेत राहणे इत्यादी गोष्टी कशा घडत

राहतात आणि त्याद्वारे कथासूत्र कसे बलवत्तर होत जाते, हे डॉ. पंडित टापरे चांगले दिग्दर्शित करतात.

या संग्रहातील एस. डी. इनामदार यांच्या 'अरण्यरुदन' या कथेचे डॉ. टापरेकृत मूल्यमापन एका चांगल्या उंचीचे आहे. आपण खरेच सुसंस्कृत आहोत का, हा प्रश्न उपस्थित करून कथालेखक इनामदार आपल्या एकूण सांस्कृतिक भानाचेच मूल्यांकन सौम्यपणे पण धीट परखडपणे कसे करतात हे टापरे येथे दाखवून देतात. परावलंबित्व, ढोंग व पोकळपणा यांमुळे माणसाची संस्कृतिशोधाची व आत्मशोधाची धडपड केवळ अरण्यरुदनासारखी कशी ठरते, परिणामी त्याच्या मनाला औदासीन्य कसे ग्रासून राहते ही कथालेखाची अपेक्षित भावसूत्रे डॉ. टापरे यांनी नेमकेपणाने टिपलेली आहेत.

एकेका कथेच्या भावसूत्राचा संशोध घेणाऱ्या या लेखानंतर डॉ. टापरे यांनी 'पाळत' (द. ता. भोसले), 'खरवड' (केशव मेश्राम), 'कर्फ्यू आणि इतर कथा' (नागनाथ कोत्तापल्ले) व 'गावरंग' (कृष्णा इंगोले) या चार कथासंग्रहांवरचे समीक्षण-लेख येथे सादर केलेले आहेत. येथेही टापरे कथाकार आविष्कृत करीत असलेली भावसूत्रे आणि त्यासाठी त्या त्या कथाकाराने रचलेला व्यूह यांचाच संशोध घेताना दिसतात. 'पाळत' हा द. ता. भोसले यांचा विनोदी कथांचा संग्रह असला, तरी तो हसता हसता आपणास अंतर्मुख करू पाहणारा गंभीरच कथासंग्रह कसा आहे, हे टापरे आपल्या ध्यानात आणून देतात. स्वप्रभंग, कृतिहीनता, उदासीनता, ढोंगीपणा, अधिकारशाही इत्यादी मानवी प्रवृत्तींवर प्रकाश टाकणारा हा हलक्याफुलक्या कथांचा संग्रह आहे. सामाजिक जीवनात माजलेले असत्य व त्यातून निर्माण होणारे ताणतणाव यांचे दर्शन घडवीत राहणे, हेच या संग्रहातील विनोदी कथांचे एकूण ध्येयधोरण आहे, हे टापरे या संग्रहाच्या समीक्षेतून आपल्याला पटवून देतात. केशव मेश्राम यांच्या 'खरवड' या संग्रहाचे मूल्यमापन टापरे यांनी दलित साहित्यातून व्यक्त होणाऱ्या वेदना-विद्रोहाची वेगळी, अनोखी अशी पातळी दाखविणारा संग्रह असे केले आहे. या कथांमध्ये विषयातील विविधता तर आहेच, पण दलित जीवनातील ग्रामीण व शहरी भावविश्वातील स्तरभेदही आहेत, टापरे यांचे निरीक्षण मौलिक आहे. 'कर्फ्यू आणि इतर कथा' या संग्रहातून कथालेखक डॉ. नागनाथ कोत्तापल्ले जीवनातील चैतन्यहीनता व त्यामुळे येणारा भकासपणा यांचा प्रत्यय देत राहतात, असे टापरे यांचे म्हणणे आहे. पुरुषप्रधान संस्कृतीतील विकृतीकडे जाणारे स्त्री-पुरुषसंबंध, परस्पर-अविश्वास आणि हिंसक वृत्ती यांचीच चित्रे कोत्तापल्ले यांची कथा रेखाटत राहते, असे टापरे यांना वाटते. 'हृदयातील चांदणे' हा रत्नप्रभा शहाणे यांचा कथासंग्रह उच्च-मध्यमवर्गीयांच्या आशा-निराशांचे, आत्मविश्वास वा अविश्वासाचे अनोखे शिल्प कोरणारा आहे असे डॉ. टापरे यांचे या संग्रहाबाबतचे निदान आहे. हा संग्रह वाचकाला विचारचक्रात गरगरत सोडणारा आहे, असेही ते सूचित करतात. 'गावरंग' या कृष्णा इंगोले यांच्या कथासंग्रहात ग्रामीण जीवनात रंग भरत राहणाऱ्या अंधश्रद्धा, भाऊबंदकी, व्यक्तिद्वेष या गोष्टींचे वास्तव पण सरळ चित्र येत राहते. 'पाणी' ही इंगोळे यांची कळीची

कथा म्हणता येईल असे टापरे यांना वाटते. कारण या कथेमध्ये पाण्याचे गावजीवनाच्या वेगवेगळ्या परिस्थितीत बदलत जाणाऱ्या भूमिकांचे नाट्यच कथाकार इंगोले यांनी परिणामवाचकतेने टिपलेले आहे. डॉ. टापरे यांची येथील सर्वच कथासंग्रहाची समीक्षा मितभाषी पण निरीक्षणबहुल अशी आहे. कथांची खोली गाठायची आणि कथाकाराचे 'म्हणणे' संशोधायचे, हे दोन प्रयत्न ते करताना दिसतात.

या समीक्षासंग्रहातील शेवटचा लेख मराठी ग्रामीण कथेचा तंत्रविचार करणारा आहे. ग्रामीण कथेच्या आजवरच्या समीक्षेत हा लेख वेगळा उठून दिसणारा असाच आहे. याला दोन कारणे आहेत. एक म्हणजे ग्रामीण कथा हे मराठी कथाप्रवाहाचा एक अविभाज्य अंग म्हणून टापरे पाहतात व तपासतात. दुसरी गोष्ट म्हणजे नवकथेनंतर खऱ्या अर्थाने ग्रामीण कथा का उदयास यावी याचाही एक ऐतिहासिक विचार ते करतात. मराठी कथेचा उदय, नवकथेचे आगमन, नवकथा व ग्रामीण कथा यांतील नातेसंबंध, तंत्रविकासाच्या दृष्टीने ग्रामीण कथेने दाखविलेला अनुत्साह यांचा एक चांगला तात्त्विक विचार या शेवटच्या लेखात केलेला आहे. ग्रामीण कथेचा विकास का खुंटत गेला, याची थोडकी उत्तरे शोधण्यास हा लेख मार्गदर्शक ठरेल अशा ताकदीचा आहे.

टापरे यांचा हा समीक्षासंग्रह मराठी कथासमीक्षेला नवदृष्टी देणारा आहे, कथासमीक्षा समृद्ध करणारा आहे आणि त्याचबरोबर तो नव्या समीक्षकांचे यथोचित प्रशिक्षण करणाराही आहे. त्यामुळे तो दुर्लक्षित राहता कामा नये.

**कु. दीपा प्रकाश सावंत**
द्वारा- प्रा. विजयकुमार फरांदे
प्राध्यापक कॉलनी, एस.टी. स्टॅण्डजवळ,
मु. पो. वाई

■

## 'आल्या जुळून तारा'– सुरेल गीतांचा उत्कट आविष्कार

### डॉ. सुलभा हेर्लेकर

बीडच्या डॉ. सुहासिनी इर्लेकर हे नाव कवयित्री म्हणून सर्वपरिचित आहे. जवळजवळ चाळीस वर्षे अखंड कवितेचं व्रत त्यांनी सांभाळलं आहे. या चाळीस वर्षांत कविता, तिचा प्रवाह कितीतरी मार्गांनी बदलत गेला. पण सुहासिनी इर्लेकर यांच्या कवितेतील गेयता, भावपूर्णता, नव्या विषयांना स्पर्शून जाऊन त्यातही आणलेली भावमाधुरी हे कायम तेच राहिले. संगीताची उत्तम जाण आणि संतकाव्याचा अभ्यास - यामुळे त्यांच्या कवितेला एक अध्यात्माची बैठकही प्राप्त झाली आहे. तरीही सर्वदूर जाणवते ती प्रीती, प्रेम, आणि त्या



अनुक्रमणिका






प्रेमाचा सुरेल आविष्कार! 'आल्या जुळून तारा' ह्या त्यांच्या नवीन संग्रहात गीतांनाच प्राधान्य आहे. ही सर्व गेयरचना अत्यंत अचूक लयीत, नादगर्भी आणि अर्थपूर्ण शब्दांनी बांधलेली आहे.

रोजच्या जगण्यात मानव, निसर्ग, समाज, मानवाचाच मानवाशी चाललेला संघर्ष, त्यांचा गेलेला तोल, त्यामुळे व्यथित झालेले व्यक्तिमत्त्व आणि त्याचा स्वत:च्या जीवनाशी असलेला संबंध शोधणे, आणि या सर्व भावनिक वादळांना झेलून कवितेत प्रसन्नता आणणे हे काम कवीच करतो. जगण्याचा संदर्भ न हरवता जगण्यावर प्रेम करणे हेच तर कवीच्या निर्मितीचे सूत्र आहे. हेच सूत्र सुहासिनीबाईंच्या कवितेत असल्याने प्रीती आणि प्रीतीच्या सुंदर तऱ्हा यात त्या खऱ्या अर्थानी रमतात. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या गाभाऱ्यातून हा निखळ प्रीतीचा झरा रिमझिमत येतो. कवितेतून आणि शब्दांच्या सहज लयीतून गीत बनून वाहत राहतो.

***उमलून हसले फूल वेलीचे***
***अवचित हळवे गूज,***
***आता तरी अधरावर ठेवी***
***सखया तव अलगुज*** (पृ. ३८)

किंवा

***तू नको उखाणा घालू***
***वाळूत सरकतो पाय,***
***सांजावून भर दिवसाचे***
***आले तर काय उपाय?*** (पृ. ३९)

अशा वाहत्या शब्दकळेतून प्रीतीच्या छटा त्या व्यक्त करीत जातात. कधी विरहाच्या तारा छेडल्या जातात. डोळ्यात प्रीतीची तोरणं बांधून चांदण्याच्या प्रकाशावर जगणारी ही कवयित्री विरह गाथेतही बुडून जाते. ही विरहाची जातकुळीही वेगळीच!

***गळत असता पाकळ्या मी घट्ट मिटले ओठ रे***
***मी कधीच येऊ दिला ना पापणीला पूर रे***

किंवा

***पांगणाऱ्या सांध्य छाया दूर गेल्या दूर रे***
***वाहत्या वाऱ्यात विरले जिवलगांचे सूर रे***

अशा काव्यमय संवेदनक्षम ओळीतून विरहार्त भावना कवयित्री अभिव्यक्त करते तेव्हा त्या शब्दातली गेयता जितकी भिडते तितकेच त्या शब्दांची अर्थघनता आणि नादमयताही लक्षात येते. 'चंद्रकंस!', 'फार दिवसानी आली', 'ये अशी गीतात', 'तू नच शाश्वत' अशा

कितीतरी कवितांतून हे भाव उत्कटपणे अभिव्यक्त झालेले आहेत. निसर्ग हा त्यांच्या अनुभव-प्रकटनासाठी येतो. त्यांच्या अनुभवाच्या लयीला ही निसर्गाची भाषिक लय सापडते आणि कविता लयबद्ध होते. मूळ भावोत्कट अनुभव, त्यासाठी चांगल्या नादमयी शब्दांची निवड आणि या शब्दांची मूळ भावनिक अवस्था, अनुभवाची लय असे एकत्रीकरण होऊन चांगली लयबद्ध कविता घडते. सुहासिनीबाईंना यातील कित्येक कवितेत ही किमया साधली आहे.

उत्कटपणे आयुष्यात येणारे क्षण जगावेत, जगण्यातली नव्हाळी निसर्गातून अनुभवावी, कधी आनंदित व्हावे, कधी मोहरून जावे, कधी विरहार्त मनाने हळवे व्हावे, जगण्यावर मनसोक्त प्रेम करावे, एकटेपणाची जाणीव पुसून टाकावी, तेही क्षण कुणाच्या तरी आधाराने फुलून यावेत आणि सतत मनाचा ताजेपणा फुलत ठेवावा अशा या भावपूर्ण कविता आहेत. 'पाचूचे रंग काचपाण्यातुन सांडती । शीळ निळाईत भरत पवन गंध वेचिती!' अशा प्रसन्न शब्दातून ही गीतं अभिव्यक्त होत राहतात. इतर साहित्याची भाषा व कवितेची भाषा यात नेहमीच फरक असतो. शब्दार्थापेक्षाही कवितेचे अस्तिव जाणवते ते तिच्या अभिव्यक्तीतून! ही अभिव्यक्ती कधी लोकगीत, लोकपरंपरा, छंदातून, अष्टाक्षरी तर कधी गझलेतूनही प्रकट होते. सहाणही पाझरली, चुरचुरे फुलवात, आरतीआरास, घोष ऋचांचा, रूप विदेहू, रुणुझुणु छांदसवेळ, अशा कितीतरी शब्दप्रतिमा कवितेला एक वेगळाच साज देतात. सहजतेने भारलेल्या प्रेमानुभावाचे वेगवेगळे आयाम साकारत प्रीतीगीत आळवतानाच या गीतातल्या तळ्यातही कवयित्री उतरते. शेवटी 'तो' म्हणजे ईश्वराचा शोध घेण्याचाही एक प्रयत्न असतो. बालक्रीडातूनही याच ईश्वराचा त्या शोध घेतात असे वाटत राहते.

संगीतात जसा ओंकार असतो, तसेच कवितेतही एक ओंकार असतो. तळातले अनुभव या ओंकारासारखेच ओजस्वी असतात. इथे तर कवयित्रीला संगीत आणि काव्य अशी दुहेरी प्रतिभा लाभली आहे. याच अनुषंगाने पुस्तकाच्या सुरवातीला लिहिलेली दीर्घ प्रस्तावना मला अतिशय महत्त्वाची वाटते. स्वत:ची ही गीतकाव्यात्मक रचना साकारताना कवयित्रीच्या मनात कवितेविषयी एकूणच जे विचारांचे मंथन झाले त्याचे विवेचन म्हणजे ही प्रस्तावना आहे. कवयित्री म्हणते, गीतकाव्य आणि गाणे ह्यातील सीमा धूसर भासल्या तरी त्या निश्चितपणे असतात. गीत हे भावलक्ष्यी असते तर गाणे गीतलक्ष्यी असते. विशुद्ध भावकविता आणि गाणे ह्यांना जोडणारा दुवा म्हणजे गीतकाव्य असते. त्यात काव्यगुणही असतात आणि गीतगुणही असतात! पुढे त्या म्हणतात, ''गीत' आणि 'गाणे' ह्यातील अंतर लक्षात न घेतल्याने 'गीतकाव्या'ची चर्चा करताना 'गाण्याची'च चर्चा होताना दिसते. गीतकाव्य ही केवळ रचना नसते तोही एक अनुभव असतो! छांदस भावकवितेप्रमाणेच गीतकाव्यही उपलब्ध भाषेची सामग्री हाताळते!..'' या पद्धतीने गीतकाव्याचे सामर्थ्य पटवून देण्यात कवयित्री यशस्वीही होते. हे विवेचन केवळ वरवरचे नाही. ते अत्यंत पोटतिडकीने आणि इतक्या वर्षांच्या अभ्यासातून आलेले आहे. शिवाय त्या म्हणतात, 'माझ्या मते विशुद्ध

भावकवितेला 'गीतकाव्य' असे संबोधण्यापेक्षा 'छांदसकाव्य' असे म्हणणे उचित ठरेल.' हे कवयित्रीचे गीतकाव्याबद्दल निरीक्षण आहे. आणि ते तसे महत्त्वाचेही आहे. आपण सारेच गीत, गाणे, काव्य, कविता या साऱ्यांची 'कविता' याच प्रकारात शिरून गुंतागुंत करतो! याकरता कवयित्रीने काही ग्रेसच्या कवितेची, बहिणाबाईंची उदाहरणे देत गीतकाव्याच्या मनोभूमिकेचा आविष्कार कसा होतो याचा अत्यंत सावधगिरीने ऊहापोह केला आहे. मराठी कवितेच्या दृष्टीने हे विवेचन अत्यंत महत्त्वाचे ठरावे असेच आहे. या पार्श्वभूमीवर 'आल्या जुळूनी तारा!' या संग्रहातील कविता या आंतरिक ऊर्मीने प्रकटलेल्या कविता आहेत आणि त्यातील गीतगुण हे कवयित्रीच्या अभिजात संगीताभिरुचीतून आले आहेत. स्त्री, वात्सल्य, मातृत्व, प्रेयसी, पत्नी ही स्त्रीभोवतीची विविध केंद्रे भावपूर्ण रीतीने शब्दात बांधून एक चिंतनाचा स्पर्शही या कवितेत झाला आहे. गीत काव्यनिर्मितीचे हे चिंतनच कवयित्रीच्या कवितेचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे असे वाटते.

आज मराठी काव्यविश्वात अनेक प्रवाह आले. काही स्थिरावले. काही वाहून गेले, काही जुनेच चारोळ्यांच्या निमित्ताने पुढे आले. पण आज मराठी काव्यविश्वात गीतकाव्य फारसे आढळत नाही. त्याचे पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न सुहासिनीबाईंनी केला. डॉ. द. दि. पुंडे म्हणतात त्याप्रमाणे, 'कविता लिहिणारी स्त्री म्हणून नव्हे तर अस्सल व अव्वल काव्यवृती बाळगणारी व्यक्ती म्हणून त्यांनी स्वत:चे एक स्थान निर्माण केले आहे! गीतमयता आणि काव्यमयता यांचा मिलाफ या कवितांत दिसून येतो. सतत मनाचा ताजेपणा कवितेतून फुलवत ठेवावा ही अवघड गोष्ट सुहासिनीबाईंच्या प्रतिभेला साध्य झाली आहे. या संग्रहाचा आस्वाद प्रत्येकाने घ्यावा अशीच यातील 'गीते' आहेत.'

**डॉ. सुलभा हेर्लेकर**
१२२, अभ्यंकर रोड,
धंतोली, नागपूर १२

❑

---

## स्वागत

**योगभ्रष्टपिता,** जयश्री शंकरन, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, ३२
**साहित्य वेध,** मीना वैशंपायन, श्री विद्या प्रकाशन, पुणे, २०३
**सावरकरांचा बुद्धिवाद व हिंदुत्ववाद,** शेषराव मोरे, राजहंस प्रकाशन, २०३
**सावरकरांच्या समाजक्रांतीचे अंतरंग,** शेषराव मोरे, राजहंस प्रकाशन, २६१
**मुस्लिम मनाचा शोध,** शेषराव मोरे, राजहंस प्रकाशन, पुणे, ७६५
**आस्वादक संगीत समीक्षा,** श्रीरंग संगोराम, राजहंस प्रकाशन, पुणे, २०८
**भारत-२०२०,** अनु. अभय सदावर्ते, राजहंस प्रकाशन, पुणे, ३२३
**बेघर,** प्रतिमा कुलकर्णी, लेखिका पुस्तक प्रकाशन, अमरावती, ११२



अनुक्रमणिका

## कार्यवृत्त म.सा.प., पुणे
## (१ एप्रिल २००३ ते ३० जून २००३)

**१० एप्रिल, २००३. ज्ञानकोशकार श्री. व्यं. केतकर स्मृतिदिन.**

डॉ. केतकर स्मृतिदिनाच्या निमित्ताने सकाळी १० वाजता कमला नेहरू उद्यानातील केतकरांच्या समाधीस पुष्पगुच्छ अर्पण करून कृतज्ञता व्यक्त केली. याप्रसंगी परिषदेचे कार्याध्यक्ष, प्रमुख कार्यवाह व इतर पदाधिकारी उपस्थित होते.

त्याच दिवशी संध्याकाळी ६.३० वाजता परिषदेच्या पटवर्धन सभागृहात प्राध्यापक आणि ज्येष्ठ समीक्षक रा. ग. जाधव यांचे 'ज्ञानकोश ते विश्वकोश' या विषयावर व्याख्यान झाले. कोश वाङ्मयाचा पाया घालणारे प्रॅ. केतकर हे अनेक कोशकारांचे प्रेरणोस्थान होते हे सांगून प्रा. जाधव यांनी कोश वाङ्मयाची आवश्यकता स्पष्ट केली. याप्रसंगी कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**५ मे, २००३. बालकवी स्मृतिदिन.**

बालकवी स्मृतिदिनाच्या निमित्ताने निमंत्रितांचे कविसंमेलन आयोजित केले होते. अध्यक्षस्थानी डॉ. अरुणा ढेरे होत्या. कविसंमेलनाचे सूत्रसंचालन डॉ. मिरदेव गायकवाड यांनी केले. बालकवींसारख्या हळव्या प्रकृतीच्या कवीचा स्मृतिदिन. त्यातच कवींच्या कसदार रचना, त्यामुळे कार्यक्रमाला उत्स्फूर्त प्रतिसाद मिळाला.

डॉ. अरुणा ढेरे यांनी आपल्या अध्यक्षीय समारोपात बालकवींच्या 'सुंदरतेच्या सुमनावरचे दव चुंबुनी घ्यावे' यासारख्या कवितांचा संदर्भ देत बालकवींच्या काव्यलेखनाचा थोडक्यात आढावा घेतला. शेवटी त्यांनीही आपल्या दोन कविता साद्य केले. कार्यवाह दिपक करंदीकर यांनी प्रास्ताविक आणि आभारप्रदर्शन केले.

**२१ जून, २००३, कै. नाथमाधव स्मृतिदिन.**

कै. नाथमाधव स्मृतिदिनाचे औचित्य साधून या वर्षी आगळा-वेगळा कार्यक्रम आयोजित केला होता. नाथमाधवांनी स्वातंत्र्यप्रेरणा निर्माण करण्यासाठी आपल्या कादंबरी लेखनास घेतलेला शिवकालाचा आधार आणि शिवकालाला साक्षी असणारे रामदास यांचा समन्वय घडवून आणण्याच्या हेतूनेच, ज्येष्ठ साहित्यिक मा. रवींद्र भट यांच्या 'भेदिले सूर्यमंडळा' या कादंबरीच्या अभिरूप वाचनाचा कार्यक्रम आयोजित केला होता. इचलकरंजीचे चित्कला कुलकर्णी आणि उमेश कुलकर्णी यांनी ते नेटकेपणाने सादर केले.

डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले; तर दिपक करंदीकर यांनी आभार मानले.

**डॉ. मिरदेव गायकवाड**
कार्यवाह



अनुक्रमणिका







## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जळगाव

**दि. ६/७/०३**

रविवार दि. २९/६/०३ रोजी आनंदीबाई प्राथमिक शाळेच्या सभागृहात कवी आबा गोविंदा महाजन यांच्या बालगीतांची ध्वनिफितीचा प्रकाशन समारंभ कवीवर्य नारायण सुर्वे यांच्या हस्ते करण्यात आले. मा. मधुकर गायकवाड मुख्य कार्यकारी अधिकारी जि. प. जळगाव हे होते. प्रमुख अतिथी सुभाष सोनवणे, नारायण शिरसाळे अध्यक्ष म. सा. प. यांनी खानदेशातील बालवाङ्मयसंदर्भात आपले विचार मांडले. प्रास्ताविक मिलींद बागूल यांनी केले. रागिणी चव्हाण यांनी आभार मानले. म. सा. प. कार्याध्यक्ष प्रा. दिनेश पाटील, उपाध्यक्ष प्रा. शा. न. पाटील, कवी विलास मोरे, वा. ना. आंधळे, रमेश महाजन आदि साहित्यिक आणि रसिकांची उपस्थिती होती.

* रविवार दि. २९/६/०३ रोजी सायं ५।३० वा. नूतन मराङ्गा महाविद्यालयाचे सभागृहात श्री. चंद्रकांत भंडारी लिखीत 'मी, समीक्षा आणि नेमाडे वगैरे या समीक्षा ग्रंथाचे प्रकाशन मा. कवीश्रेष्ठ नारायण सुर्वे यांच्या शुभहस्ते करण्यात आले. नवीन लिहू लागलेल्या लेखकांची दखल घेतली पाहिजे. असे होत नाही. त्यामुळे आजच्या समीक्षेचीच समीक्षा होण्याची गरज आहे. असे ते म्हणाले. कार्यक्रमाचे अध्यक्षस्थानी हिन्दी लेखक चकल्लस पुरस्कार प्राप्त प्रा. शंकरराव पुणतांबेकर होते. प्रमुख वक्ते डॉ. प्रा. किसन पाटील व प्रा. नारायण शिरसाळे होते. प्रास्ताविक प्रा. दिनेश पाटील कार्याध्यक्ष म. सा. प. यांनी केले. मनोगतात लेखक चंद्रकांत भंडारी यांनी पुस्तकासंदर्भात विचार मांडले. प्रा. सुनील मायी, कवी अशोक कोतवाल, भगवान भटकर, दिवाकर चौधरी, मधु वाघोडकर, प्रा. भगवान पाटील, उत्तम सुखाडे या साहित्यिकांची आणि रसिकांची उपस्थिती होती.

अध्यक्ष<br>
**(नारायण शिरसाळे)**<br>
महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा<br>
जळगाव.

## कार्याध्यक्ष म. सा. प. सोलापूर शाखा

तब्बल तीस वर्षांनंतर सोलापूर मुक्कामी महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा सोलापूर आयोजित सोलापूर जिल्हा साहित्य संमेलन भरले. सुमारे दोन महिन्यांच्या अथक परिश्रमानंतर अत्यंत आखीव रेखीव पद्धतीने संमेलन पार पडले. दोन दिवसांच्या या संमेलनाला मोठ्या संख्येने श्रोतृवर्ग उपस्थित होता. मंगळवेढा, बार्शी, पंढरपूर, अक्कलकोट, पिंपळखुंटे, कुर्डुवाडी अशा जिल्ह्यातल्या नामवंत साहित्यिकांच्या उपस्थितीने 'जिल्हा साहित्य संमेलन' रंगले. संपूर्ण जिल्ह्याने मनापासून कौतुक केले. आयोजकांकडून संमेलनाची योजना जशी आखली गेली तशी पार पडली. प्रत्येक सत्र वेळेवर सुरू झाले आणि संपले. कुठेही










वेळकाढूपणा किंवा अपरिहार्य कारणाने कार्यक्रमात बदल, वक्त्यात बदल असा प्रकार घडला नाही. या संमेलनात दोन कविसंमेलने, दोन चर्चासत्रे, एक कथाकथन, बालकुमार मेळावा आदी कार्यक्रमाबरोबर आकर्षक ग्रंथदिंडी, मान्यवर साहित्यिकांच्या उपस्थितीने आणि वक्तव्याने भारलेला उद्घाटन सोहळा, समारोप सोहळा 'कविता सोलापुरी' ची काव्यपरंपरा पुढ्यात ठेवणारा रात्रीचा सांस्कृतिक कार्यक्रम या सर्व बाबींमुळे हे संमेलन अत्यंत श्रवणीय आणि अभ्यासपूर्ण झाले. साहित्य चळवळीला उभारी देणारे असे हे संमेलन म्हणून जिल्ह्यातल्या सर्व वर्तमानपत्रांनी आपल्या अग्रलेखांतून, बातम्यांतून संमेलनाचा मुक्तकंठाने गौरव केला.

या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रख्यात वक्ते आणि संत साहित्याचे गाढे अभ्यासक **डॉ. निर्मलकुमार फडकुले** आणि उद्घाटक म्हणून प्रा. र. रं. बोराडे अध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य सांस्कृतिक मंडळ मुंबई हे होते. प्रमुख पाहुणे म्हणून महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर, पंढरपूरचे प्रख्यात साहित्यिक डॉ. द. ता. भोसले हे उपस्थित होते. स्वागताध्यक्षाची जबाबदारी रसाळ वक्ते श्री. विवेक घळसासी यांनी उचलली होती.

संमलेनाची सुरुवात दि. ३१ मे रोजी ग्रंथदिंडीने झाली. राष्ट्रशाहीर कवी कुंजविहारी यांच्या निवासस्थानापासून सकाळी ठीक आठ वाजता ही ग्रंथदिंडी निघाली. ज्या कवीच्या राष्ट्रभक्तीच्या रचना गात, सोलापूरचे चार हुतात्मे हसत हसत फासावर चढले त्या कवीच्या निवासापासून ही ग्रंथदिंडी निघाली. सोलापूर हे बहुभाषिक शहर, त्यामुळे पालखीत ज्ञानोबा, तुकोबाबरोबर ग्रामदैवत सिद्धरामेश्वराची कन्नड वचने, तेलुगु वेमनाचे वचन साहित्य, उर्दू साहित्य, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे साहित्य आदी ग्रंथ मोठ्या भक्तिभावाने ठेवले गेले. या ग्रंथदिंडीत पारंपरिक वेषभूषेतील सुवासिनींचे नृत्य, मायबोली मराठीचे महत्त्व सांगणारे फलक, ढोल, ताशा, झांज या आवाजावर नाचणारी पाउले अशा उत्साही वातावरणाने संमेलनाची सुरुवात झाली.

ग्रंथदिंडी संमेलनस्थळी आल्यानंतर साहित्यप्रेमी, ग्रंथसंग्राहक, प्रख्यात उद्योजक बंडप्पा फुंडीपल्ले यांच्या हस्ते कवी कुमार कोठावळे ग्रंथ प्रदर्शनाचे उद्घाटन झाले. या कार्यक्रमाचे संचालन श्री. बाबूराव मैंदर्गीकर यांनी केले. त्यानंतर सोलापूर साहित्य परिषदेचे उपाध्यक्ष, प्रख्यात चित्रकार श्री. नागेश सुरवसे यांनी सोलापूर जिल्ह्यातील दिवंगत व सध्याचे नामवंत कवी यांच्या कवितांवर कलात्मकतेने रेखाटलेल्या रा. ना. पवार काव्य चित्रदालनाचे उद्घाटन सोलापूरचे चित्रकार प्रख्यात श्री. चव्हाण यांच्या हस्ते झाले. तद्नंतर मान्यवर साहित्यिक आणि रसिक मंडळी कवी संजीव प्रवेशद्वारातून, संमेलनाच्या व्यासपीठावर आले. या व्यासपीठाला कवी कुंजविहारी व्यासपीठ नाव देण्यात आले.

ठीक दहा वाजता साहित्य संमेलनाला प्रमुख पाहुण्यांच्या आणि अध्यक्षांच्या हस्ते दीप प्रज्वलन करून सुरुवात झाली. सुरुवातीला म. सा. प. सोलापूर शाखेचे अध्यक्ष कवी दत्ता हलसगीकर यांनी प्रस्तावना केली. स्वागताध्यक्ष श्री. विवेक घळसासी यांनी श्रोत्यांचे स्वागत

केले. यानंतर प्रा. रा. रं. बोराडे, डॉ. द. ता. भोसले यांची भाषणे झाली.

संमेलनाचे उद्घाटन करताना प्रा. रा. रं. बोराडे म्हणाले – "लेखकांनी नवे, सकस, वेगळे चांगले देता येते का, याचा विचार करायला हवा. जीवन सर्वांगाने बदलत आहे. नवे प्रश्न निर्माण झाले आहेत. हे प्रश्न, समस्या साहित्यात उमटायला हव्यात." त्यानंतर अत्यंत अभ्यासपूर्ण असे डॉ. निर्मलकुमार फडकुले यांचे अध्यक्षीय भाषण झाले. ते म्हणाले–

"क्रांती आणि शांती या दोन्ही अवस्थांची निर्मिती लेखणीच करू शकते. त्यामुळे आजची उदासीनता व क्रियाशून्यता नष्ट करण्यासाठी साहित्यिकांनी पुढाकार घेतला पाहिजे... आंतरभारतीचा विचार व्हायला पाहिजे..." सुमारे अडीच तास हा उद्घाटन सोहळा रंगला, शेवटी उद्घाटन सोहळ्याचे आभार म. सा. प. कार्याध्यक्ष लक्ष्मीनारायण बोल्ली यांनी मानले. या कार्यक्रमाच्या सुरुवातीला शारदास्तवन झाले. या कार्यक्रमाचे सूत्र संचालन सुनीता तारापुरे यांनी केले.

दुपारचे पहिले सत्र परिसंवादाचे. याचा विषय होता 'साहित्याकडून आम्हांला काय हवे?' या परिसंवादाच्या अध्यक्षस्थानी प्रा. श्रीराम पुजारी हे होते तर परिसंवादात प्रज्ञा देशपांडे, दत्ता गायकवाड, दत्तात्रय थोरे, पी. एम. हर्षे, निर्मलाताई ठोकळ आदींनी भाग घेतला. 'समाजाचं प्रतिबिंब साहित्यात उमटायला हवं.' असं प्रतिपादन साऱ्याच वक्त्यांनी या प्रसंगी केलं. या परिसंवादाचे सूत्रसंचालन प्रा. माधव कुलकर्णी यांनी केले.

परिसंवादानंतर कथाकथनाचे सत्र आले. या सत्राच्या अध्यक्षस्थानी प्रख्यात साहित्यिक, समीक्षक प्रा. निशिकांत ठकार हे होते. या सत्रात अंजली श्रीवास्तव, डॉ. अनिकेत देशपांडे, सौ. आरती काळे आणि शाम सावजी यांनी भाग घेतला. अध्यक्षीय भाषणात प्रा. निशिकांत ठकार म्हणाले, "आज माहितीचा महापूर असल्याने कथाकाराला सहजपणे कथेसाठी विषय मिळतात. वाङ्मयीन व वाचन (कथन) कथा असे कथेचे दोन प्रकार पडतात. हे सत्र फारच रंगले. या सत्राचे सूत्रसंचालन कार्यवाह पद्माकर कुलकर्णी यांनी केले.

यानंतर संध्याकाळी मान्यवर कवींचा काव्यवाचनाचा बहारदार कार्यक्रम झाला. या सत्राचे अध्यक्ष डॉ. राजेंद्र दास हे होते, तर सूत्रसंचालक कवयित्री सुजाता लोहकरे आणि कवी सुरेश पाठक यांनी केले. आशयसंपन्न अशा कवितांमुळे कविसंमेलन उत्तरोत्तर रंगत गेले. टाळ्यांच्या कडकडाटाने श्रोते दाद देत होते.

पहिल्या दिवशीच्या रात्रीच्या सांस्कृतिक कार्यक्रमात सोलापुरातील प्रख्यात कवींच्या कविता, गीते, लावण्या आदींचा कार्यक्रम झाला. सुरुवातीला राष्ट्रीय कीर्तीचे सुंद्री वादक श्री. नारायण जाधव यांच्या सुंद्री वादनाने झाला. यात आसावरी नारकर, संगीता जोशी, रागिणी कुलकर्णी, गोविंद दाते, अविनाश सलगरकर, गार्गी काळे, रजनीश जोशी, मनीषा जोशी आदी कलावंतांनी भाग घेतला. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन सौ. शोभा बोल्ली आणि स्मिता वळसंगकर यांनी बहारदार पद्धतीने केले.



अनुक्रमणिका

दुसऱ्या दिवशीचे पहिले सत्र होते परिसंवादाचे. विषय होता 'सोलापूर जिल्ह्यातील विविध भाषा, साहित्य प्रवाह आणि सांप्रदाय.' या सत्राच्या अध्यक्षस्थानी डॉ. कृष्णा इंगोले हे होते. डॉ. सौ. गीता जोशी (मराठी), डॉ. राजेंद्र बीडकर (जैन साहित्य), डॉ. राजशेखर हिरेमठ (कन्नड साहित्य), डॉ. व्यंकटेश नुले (हिंदी साहित्य), डॉ. योगीराज वाघमारे (दलित साहित्य), लक्ष्मीनारायण बोल्ली (तेलुगू साहित्य) आदींनी भाग घेतला. भाषा भिन्न असल्या, तरी त्या सोलापूरच्या मातीत कशा रुजल्या याचे सोदाहरण चित्रण वक्त्यांनी आपल्या भाषणातून केले. हा परिसंवाद अभ्यासपूर्ण झाला. या परिसंवादाचे सूत्रसंचालन बी. एस. कुलकर्णी यांनी केले.

याच वेळी सारस्वत ब्राह्मण सभागृहाच्या कवी मा. गो. काटकर व्यासपीठावर बालकुमार मेळावा रंगला. म. सा. प. सोलापूर शाखेच्या वतीने असा बालमेळावा प्रथमच भरवला गेला. या संमेलनाच्या अध्यक्षस्थानी कवयित्री सौ. विजया जहागीरदार आणि उद्‌घाटक प्रख्यात लेखिका, सौ. सुरेखा शहा या होत्या. मुलांसाठी दोन गटांत बालगीत स्पर्धा झाली. त्यानंतर नृत्य, गाणी आदी कार्यक्रमांनी हा मेळावा रंगला. या मेळाव्याचे प्रमुख पाहुणे श्री. तडवळकर म्हणाले, "वाचनाची आवड मुलांत निर्माण व्हावी यासाठी असे मेळावे वारंवार व्हावेत." तर अध्यक्षा सौ. जहागीरदार म्हणाल्या, "बालसाहित्य लिहिणे हा धर्म मानावा. पालकांनी मुलांचे गुण हेरून त्यांना प्रोत्साहित करावे." या बालमेळाव्याचे सूत्रसंचालन ॲड. अपर्णा रामतीर्थकर, शीला पत्की, कौस्तुभ गोडबोले, सुलभा दहीहंडे यांनी केले.

कवी कुंजविहारी व्यासपीठावर ठीक अकरा वाजता निवडक नवोदितांचे काव्यवाचन झाले. या कविसंमेलनाच्या अध्यक्षस्थानी पिंपळखुंट्याचे कवी नारायण सुमंत हे होते तर या संमेलनाचे सूत्र संचालन माधव पवार आणि मुकुंदराज कुलकर्णी यांनी केले. नवोदितांच्या कविताही अत्यंत आशयसंपन्न होत्या. या कार्यक्रमाला श्रोत्यांची मोठी गर्दी होती.

यानंतर संमेलनाच्या समारोपाचा कार्यक्रम झाला. या वेळी प्रास्ताविक कवी लक्ष्मीनारायण बोल्ली यांनी केले. त्यानंतर संमेलनाचे अध्यक्ष डॉ. निर्मलकुमार फडकुले, विवेक घळसासी, डॉ. गं. ना. जोगळेकर आदींची अत्यंत भावपूर्ण अशी भाषणे झाली.

डॉ. गं. ना. जोगळेकरांनी नवोदित आणि बुजुर्ग साहित्यिक यांचं नातं कसं असावं? याचं अत्यंत मनोज्ञ शैलीत स्पष्टीकरण केलं. "लेखकांच्या मागल्या पिढीने अत्यंत व्रतस्थपणे लेखन कार्य केले आहे. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, वि. स. खांडेकर, बा. भ. बोरकर यांचे दाखले देत ते पुढे म्हणाले, ज्येष्ठ साहित्यिकांनी नवीन लेखकाचा शोध घेतला पाहिजे. कोल्हटकर यांनी वि. स. खांडेकर यांना मार्गदर्शन केले, तर खांडेकर यांनी कुसुमाग्रजांना मार्गदर्शन केले. त्यांच्या साहित्य लेखनात श्रद्धा, उपासना, तपश्चर्या होती म्हणून त्यांना ज्ञानपीठ पुरस्कार मिळाले."

या वेळी ग्रंथ चळवळीला हातभार लावणाऱ्या नऊ ग्रंथपालांचा सत्कार अध्यक्षांच्या हस्ते झाला.

या समारोप समारंभात सोलापुरात आखिल भारतीय मराठी संमेलन व्हावे, विद्यापीठ व्हावे अशा ठरावाबरोबर इतर दहा ठराव मंजूर झाले. याचे सूत्रसंचालन ॲड. जे. जे. कुलकर्णी यांनी केले.

या संमेलनाच्या यशस्वितेसाठी कवी दत्ता हलसगीकर, कवी लक्ष्मीनारायण बोल्ली, कवयित्री सौ. विजया जहागीरदार, नागेश सुरवसे, बाबूराव मैंदर्गीकर, ॲड. जे. जे. कुलकर्णी, पद्माकर कुलकर्णी बी. एस. कुलकर्णी, किशोर चंडक, अरविंद जोशी, अरुण लोहकरे, प्रमिला राऊत, माधव पवार, बदीउज्जमा बिराजदार, जयंत राळेरासकर, मेधा भोसेकर, शोभना सागर, सुहास पुजारी, मारुती कंटकधोंड, अपर्णा रामतीर्थकर, शीला पत्की, माधव कुलकर्णी आदींनी विशेष परिश्रम घेतले.

दि. ३१ मे व १ जून रोजी झालेले हे जिल्हा साहित्य संमेलन सोलापूरच्या वाङ्‌मयीन कारकीर्दीत अनेक वर्षे 'स्मृती' म्हणून राहील याची ग्वाही अनेक साहित्य रसिकांनी या प्रसंगी दिली.

**लक्ष्मीनारायण बोल्ली**
कार्याध्यक्ष

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा इस्लामपूर

### ५ मे, २००३ चर्चासत्र

राष्ट्रपती डॉ. ए. पी. जे अब्दुल´कलाम यांच्या **''अग्निपंख''** या ग्रंथावर चर्चासत्र आयोजित. प्राचार्य शरद भोसले, प्रा. व्ही. डी. कदम, प्रा. शामराव पाटील, प्रा. डॉ. दीपा देशपांडे, प्रा. मधुकर हसमनीस, प्रा. शैला सायनाकर, सौ. वृषाली आफळे यांनी या ग्रंथावर विविध दृष्टिकोनातून आपली मते मांडली. प्रास्ताविक डी. आर. सलगर यांनी केले आणि आभार प्रा. दशरथ पाटील यांनी मानले.

### २३ मे, २००३ डॉ. मधु कुळकर्णी स्मृतिदिन.

कथाकार डॉ. मधु कुळकर्णी यांचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. श्री. वामन काळे, निवेदक आकाशवाणी सांगली यांचे **''आपले कलात्मक जीवन''** या विषयावर व्याख्यान झाले. प्रास्ताविक व पाहुण्यांचा परिचय डॉ. दीपा देशपांडे यांनी करून दिला. आभार डॉ. मंगल कोकाटे यांनी मानले.

### ५ जून, २००३ करमणुकीचा कार्यक्रम

विनोद, नकला, गीत गायन, कविता वाचन, नाट्य प्रवेश सादरीकरण, सुगम संगीत इत्यादी प्रकारचे करमणुकीचे कार्यक्रम आयोजित केले होते. हे कार्यक्रम सौ. वृषाली आफळे, प्राचार्य शरद भोसले, डॉ. दीपा देशपांडे, मंगल कोकाटे, आणि परिषदेचे पदाधिकारी व सदस्य यांनीच सादर केले कार्यक्रमाचे नियोजन चांगल्या प्रकारे करण्यात आले. प्रास्ताविक व स्वागत प्रा. शामराव पाटील यांनी केले.



अनुक्रमणिका






**५ जुलै, २००३ चर्चासत्र**

**''एक होता कार्व्हर''** या आत्मचरित्रात्मक ग्रंथावर चर्चासत्र आयोजित केले. डॉ. दीपा देशपांडे, प्रा. शामराव पाटील, प्रा. व्ही. डी. कदम, प्रा. शैला सायनाकर, श्री भगवान मोरे, सौ. वृषाली आफळे यांनी चर्चासत्रात भाग घेतला. प्रास्ताविक धोंडीराम सलगर यांनी केले आणि आभार प्राचार्य शरद भोसले यांनी मानले.

**गुणवंत विद्यार्थी सत्कार**

इयत्ता १० व १२ तसेच माध्यमिक शिष्यवृत्ती परीक्षेत गुणवत्ता यादीत आलेल्या कु. सुमित गरुड, कुमारी पद्मजा पाटील, कुमारी अश्विनी डुबल, कु. प्रवीण शेडे, कु. रोहनील राजे यांचा सत्कार ॲड. बी. एस. पाटील यांच्या हस्ते करण्यात आला. या प्रसंगी त्यांना ग्रंथ भेट देण्यात आले. समारंभाचे अध्यक्षस्थान प्रा. शामराव पाटील यांनी भूषविले. प्रा. दशरथ पाटील यांनी आभार मानले.

**श्रद्धांजली**

शिक्षणतज्ज्ञ बॅ. पी. जी. पाटील, संस्कृतचे गाढे अभ्यासक डॉ. पां ना. कुलकर्णी, माजी रा. स्वं. संघचालक रज्जूभैया, साहित्यिका स्नेहलता दसनूरकर यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

**पा. दशरथ पाटील,**
कार्याध्यक्ष,
म. सा.प. शाखा इस्लामपूर

---

**स्वागत**

**काचेचं स्वप्न,** दत्तात्रय कांबळे, स्पर्श प्रकाशन, रत्नागिरी, १६०
**भीमसेन,** वसंत पोतदार, राजहंस प्रकाशन, पुणे, २५४
**हसा पण लठ्ठ होऊ नका,** य. न. महाबळ, गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद, ९५
**मंथन,** य. ज. महाबळ, गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद, १९७
**भारतीय रेल्वेची कहाणी,** अनुराधा फाटक, सार्थक प्रकाशन, पुणे, ४०
**क्षमा,** अनुराधा फाटक, सार्थक प्रकाशन, पुणे, ३२
**पाखराची वाट,** विजय पाडळकर, यक्ष प्रकाशन, नांदेड, १४०
**उदक चालवावे युक्ती,** विलासराव साळुंखे, ग्रामगौरव प्रतिष्ठान, पुणे, १७४
**वासांसि जीर्णानि,** महेश एलकुंचवार, मौज प्रकाशन, मुंबई, ८३
**महासुखाचा सोहळा,** पद्माकर देशपांडे, श्री सुधा प्रकाशन, नाशिक, ३३०

## म. सा. प. तर्फे घेतल्या जाणाऱ्या परीक्षेसंबंधी

***मराठीचा बाणा । सार्थ अभिमान । बाळगावे ज्ञान । मराठीचे ।।***

प्रतिवर्षी जानेवारी महिन्यात म. सा.प. तर्फे प्रथमा, प्रवेश, प्राज्ञ व विशारदच्या परीक्षा घेतल्या जातात.

प्रथमा परीक्षेसाठी एकूण १०० गुणांची एकच प्रश्नपत्रिका असून 'घामाची फुले' अर्थात सानेगुरुजींच्या गोड गोष्टी (भाग-२) या पाठ्यपुस्तकावर, तसेच व्याकरण व लेखनावर आधारित ही प्रश्नपत्रिका असेल.

'प्रवेश' परीक्षेसाठी एकूण २०० गुणांच्या दोन प्रश्नपत्रिका असून जाईजुई (य.गो. जोशी) व काव्यगंगा (संपादक : डॉ. भीमराव कुलकर्णी) या गद्य-पद्य संग्रहावर आधारित पहिली प्रश्नपत्रिका असून व्याकरण, अलंकार, लेखन व भाषांतराचा दुसऱ्या प्रश्नपत्रिकेत समावेश असेल.

'साहित्य-प्राज्ञ'साठी एकूण ३०० गुणांच्या तीन प्रश्नपत्रिका आहेत. त्यात सारे प्रवासी घडीचे (जयवंत दळवी), अंमलदार (पु. ल. देशपांडे) आणि जोगिया (ग. दि. माडगूळकर) या अर्वाचीन गद्य-पद्यावर आधारित १०० गुणांची एक प्रश्नपत्रिका, आणि पु. भा. भावे या विशेष ग्रंथकार म्हणून अभ्यासासाठी निवडलेल्या ग्रंथकाराच्या 'सतरावे वर्ष', 'अकुलिना' 'रक्त आणि अश्रू', 'वाकुल्या' या कथा-कादंबरी-वैचारिक निबंध-ललित लेख इत्यादी वाङ्मयप्रकारांच्या अभ्यासावर आधारित दुसरी १०० गुणांची प्रश्नपत्रिका आहे. तिसऱ्या १०० गुणांच्या प्रश्नपत्रिकेत सर्व प्रकारच्या व्याकरण लेखनाचा समावेश असेल.

'साहित्य-विशारद' परीक्षेसाठी एकूण ६०० गुणांच्या सहा प्रश्नपत्रिका आहेत. शतपत्रे (लोकहितवादी) आणि अग्निनृत्य (शि. म. परांजपे यांचे संपादित निबंध) या ग्रंथाभ्यासास १०० गुण, ज्ञानेश्वरी अध्याय पहिला आणि महानुभाव गद्य (संपादक : शं. गो. तुळपुळे) या ग्रंथाभ्यासास १०० गुण, अर्वाचीन 'कथा' वाङ्मयाच्या अभ्यासास १०० गुण, भारतीय साहित्य शास्त्राची मूलतत्त्वे १०० गुण, भाषाविज्ञान व व्याकरण १०० गुण आणि उपयोजित मराठी १०० गुण अशा ६०० गुणांच्या सहा प्रश्नपत्रिका असतील.

प्रथमा, प्रवेश व साहित्य-प्राज्ञ अभ्यासक्रमाचा कालावधी प्रत्येकी एक वर्षाचा असून, त्यासाठी परीक्षा शुल्क अनुक्रमे १५, ३० आणि ५० रु. ठेवलेले आहे. 'साहित्यविशारद'चा कालावधी दोन वर्षांचा असून परीक्षा शुल्क १०० रु. (दोन वर्षांसाठी) ठेवलेले आहे. साहित्य-विशारदच्या एकूण सहा प्रश्नपत्रिकांपैकी १ ते ३ प्रश्नपत्रिका पहिल्या वर्षी ५० रु. परीक्षा शुल्क भरून तर ४ ते ६ प्रश्नपत्रिका दुसऱ्या वर्षी ५० रु. शुल्क भरून देण्याची सोयही उपलब्ध आहे. सर्व परीक्षा जानेवारी महिन्याच्या पहिल्या किंवा दुसऱ्या आठवड्यात घेतल्या जातात. जानेवारी २००४ मध्ये होणाऱ्या परीक्षांचे काम सुरू झाले आहे.

**डॉ. कल्याण इनामदार**
निमंत्रक व परीक्षाप्रमुख,
फोन ९५२०-५४४३५५५



अनुक्रमणिका

# पारितोषिके - एप्रिल, मे, जून २००३



नन्दा सुर्वे

**१७ एप्रिल २००३ — कै. शं. ना. जोशी पारितोषिक**

कै. शं. ना. जोशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त सामाजिक, ऐतिहासिक किंवा सांस्कृतिक विषयांवरील दर्जेदार वैचारिक ग्रंथासाठी देण्यात येणारे रु. ५००० चे पारितोषिक या वर्षी न्या. नरेंद्र चपळगावकर यांना त्यांच्या 'राज्यघटनेचे अर्धशतक' या ग्रंथाबद्दल प्रदान करण्यात आले. डॉ. सत्यरंजन साठे हे कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी होते. परीक्षकांच्या वतीने डॉ. वि. मा. बाचल यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. गं. ना. जोगळेकर हे सहपरीक्षक होते. त्यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**१९ एप्रिल २००३ - कै. स. ह. मोडक पारितोषिक.**

कै. स. ह. मोडक यांच्या स्मृतिदिनानिमित्त देण्यात येणारे रु. २००० चे पारितोषिक अनुवादित ग्रंथास किंवा ज्येष्ठ अनुवादकास देण्यात येते. या वर्षी दीर्घकाळ कन्नड-मराठी अनुवादलेखन करणाऱ्या मीना वांगीकर यांना हे पारितोषिक देण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी उमा कुलकर्णी होत्या. विशेष निमंत्रित आशा कर्दळे यांचे अनुवाद : शास्त्र आणि कला या विषयावर व्याख्यान झाले. नंदा सुर्वे यांनी प्रास्ताविक केले व आभार मानले.

**२९ जून २००३. - दि. बा. मोकाशी पारितोषिक.**

कै. दि. बा. मोकाशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त दरवर्षी कथा/कादंबरी/प्रवासवर्णन यांपैकी एका वाङ्मयप्रकाराला रु. १००० चे दि. बा. मोकाशी स्मृती पारितोषिक दिले जाते. या वर्षी डॉ. मीना प्रभू यांच्या 'मेक्सिकोपर्व' या प्रवासवर्णनपर पुस्तकाला हे पारितोषिक देण्यात आले. ग्रंथ निवडीचे काम शीला निपुणगे व प्रमोदिनी वडके-कवळे यांनी केले. ❑

---

**स्वागत**

**ना. घ. देशपांडे व ना. धो. महानोर यांची कविता,** रा. गो. नाईकवाडे, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, ३७४

**साहित्यातील विचारधारा,** के. रं. शिरवाडकर, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, १६०

**शोध झाडा झडतीचा,** डॉ. सुवर्णा नाईक निंबाळकर, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, १६८

## नवे आजीव सभासद यादी

१) कोतली एस. एस. ऊर्फ अण्णासाहेब, सोलापूर
२) आंग्रे मोहन भालचंद्र, सोलापूर
३) क्षीरसागर उदय मोरेश्वर, सोलापूर
४) भोसले संभाजी गजानन, पुणे
५) चापेकर वि. गो., पुणे
६) मराठे विजय भास्कर, सोलापूर
७) तांबे अमृता संजीव, पुणे
८) पाटील अशुतोष रमेश, पुणे
९) लिमेय वर्षा श्यामप्रसाद, पुणे
१०) क्षीरसागर रघुनाथ विठ्ठल, सोलापूर
११) काळे नयना विवेक, सोलापूर
१२) म्हस्के सुनील नाथा, राहुरी
१३) दाते सुषमा शशांक, धुळे
१४) दाणे हेमंत, धुळे
१५) पाटील सुभाष ढोमण, धुळे
१६) बेडेकर अविनाश श्रीराम, पुणे
१७) दामले आरती अनंत, चिंचवड
१८) दामले अनंत ऊर्फ नाना, चिंचवड
१९) कांकरीया अनिल मोतीलाल, चिंचवड
२०) भळगट अलका जवाहर, भोसरी
२१) वाधवानी पूजा नरेश, पिंपरी
२२) वाधवानी नरेश ठाकुरदार, पिंपरी
२३) करकरे बी. एस्., निगडी
२४) करकरे साधना, निगडी
२५) करकरे अलका, पिंपरी
२६) करकरे एस्. बी., पिंपरी
२७) कदम सुलभा बाळासाहेब, पिंपरी
२८) कदम विठ्ठल नामदेव, पिंपरी
२९) कदम बाळासाहेब विठ्ठल, पिंपरी
३०) चिंचवडे नीलकंठ गंगाराम, चिंचवड
३१) जैन प्रतिभा पूनमचंद, चिंचवड
३२) हुइल गोळकर विनय नरसिंह, निगडी
३३) निसळ संजय नारायण, चिंचवड
३४) मोरे कमलाकर यशवंत, चिंचवड
३५) मोरे संध्या कमलाकर, चिंचवड
३६) लुंकड योगिता सुहास, निगडी
३७) सेठीया लता सुरेश, पिंपरी
३८) सेठीया सोनाली योगेश, पिंपरी
३९) सेठीया योगेश सुरेश, पिंपरी
४०) सेठीया सुरेश मोतीलाल, पिंपरी
४१) सोहनी मुक्ता श्रीप्रसाद, चिंचवड
४२) पिंपळखरे - उपाध्ये विनीता, पुणे
४३) शिंगटे सागर भिमराव, पुणे
४४) महाजनी क्षमा राहुल, पुणे
४५) गिजरे भास्कर पांडुरंग, पुणे

❑

## स्वागत

**मराठी स्त्री,** डॉ. दु. का. संत, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, ३०२
**पस्तुरी,** डॉ. द. भि. कुलकर्णी, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, १९२
**कादंबरी-स्वरूप व समीक्षा,** पद्मगंधा प्रकाशन, पुणे, १६६
**अयनांश-**डॉ. बेगम जहाआँरा-अनु- डॉ. अपर्णा झा-पद्मगंधा, पुणे, २१६
**भगवान विश्वकर्मा : आनंद राज शिर्के,** महाराष्ट्र इंटरनॅशनल ट्रस्ट, पुणे, ३२
**छात्रांचे विचार वैभव :** संगीता पुराणिक, स्वत: लेखिका, प्रकाशक पुणे, ६९

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

| | | |
|---|---|---|
| खंड १ ला | रु. ४००/- | |
| खंड २ रा भाग– १ व भाग– २ | रु. ३५०/- | व रु. ३००/- |
| खंड ३ रा | रु. ३५०/- | |
| खंड ४ था | रु. ४००/- | |
| खंड ५ वा भाग– १ व भाग– २ | रु. ३५०/- | व रु. ३५०/- |
| खंड ६ वा भाग– १ व भाग– २ | रु. ३५०/- | व रु. ३००/- |
| | रु. ३,१५०/- | |

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनीही रु. २५००/- डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस. टी. पार्सलने पाठवू.**

(वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपाल खर्च वेगळा.)

---

मराठी साहित्यसृष्टीतील अभिनव उपक्रम : म. सा. परिषदेने सिद्ध केलेला अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा इंग्रजी इतिहास

**A HISTORY OF MODERN MARATHI LITERATURE - VOL. I**

■

**संपादक**

**श्री. राजेंद्र बनहट्टी, डॉ. गं. ना. जोगळेकर**

■

पृष्ठसंख्या ३५०, किंमत रु. ४००/- ग्रंथ विक्रेत्यांना भरपूर सूट वैयक्तिक ग्राहकांनीही सवलतीसाठी संपर्क साधावा.

**या ग्रंथाचा दुसरा खंड लवकरच प्रसिद्ध होत आहे.**

■

: मागणीसाठी संपर्क :

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे– ४११ ०३०. दूरध्वनी : ४४७५९६३.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



